


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

SSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल ते जून २०१७

## मसाप वार्षिक ग्रंथपुरस्कार २०१७





















# क्षणचित्रे



मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा म्हणून मा. मुख्यमंत्र्यांनी आग्रही भूमिका घ्यावी यासाठी मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कोशाध्यक्ष सुनीताराजे पवार, सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी, रवींद्र बेडकिहाळ, कार्यवाह वि.दा. पिंगळे, दीपक करंदीकर यांनी पाचगणी येथे मुख्यमंत्र्यांना भेटून निवेदन दिले. मा. मुख्यमंत्र्यांनी मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी प्रयत्न करणार असल्याचे आश्वासन या शिष्टमंडळाला दिले.




महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या १११व्या वर्धापनदिन समारंभासाठी प्रमुख पाहुण्या म्हणून प्रसिद्ध कन्नड लेखिका वैदेही उपस्थित होत्या. त्यांच्या हस्ते लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक स्वीकारताना ज्येष्ठ लेखिका सई परांजपे.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३५९, एप्रिल-जून २०१७



संपादक

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



संपादन समिती

**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**



प्रकाशक

**प्रकाशक पायगुडे**

प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका










मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**शिरीष चिटणीस**
७५८८८६५०५१

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

मुद्रणस्थळ
**पुणे विद्यार्थी गृह,**
**महाराष्ट्र मुद्रणशाळा छापखाना**
**सदाशिव पेठ, पुणे**
**४११०३०.**

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३५९
एप्रिल-जून २०१७



# अं त रं ग





अनुक्रमणिका





संपादकीय

**डॉ. पुरुषोत्तम काळे**

# मराठी 'अभिजात' कधी होणार?

मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्र सरकारने मा. रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित केली. या समितीने २०१३ सालीच आपला अहवाल शासनाकडे सुपूर्द केला. हा अहवाल केंद्र सरकारला पाठवण्यात आला. २०१७ मधील सहा महिने संपत आले तरी या अहवालावर अधिकृत निर्णय केंद्र सरकारने घेतलेला नाही. याविषयी समितीचे अध्यक्ष रंगनाथ पठारे यांनी मुख्यमंत्र्यांना खुले पत्र लिहून या प्रश्नाविषयी केंद्र सरकारकडे पाठपुरावा करण्याची तसेच मराठीला अभिजात भाषा दर्जा मिळण्यात काही अडचणी असल्या तर त्याविषयी राज्याचे प्रमुख या नात्याने अधिकृत निवेदन करण्याची विनंती केली आहे. मा. पठारे सरांनी केंद्र सरकारला मराठी भाषिकांनी, साहित्य संस्थांनी आणि कार्यकर्त्यांनी पत्रे पाठवून मराठीला अभिजात भाषेचा दर्जा त्वरित द्यावा, अशी सूचना केली होती. या सूचनेचे पालन करून महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या विविध शाखांनी मा. पंतप्रधान नरेंद्र मोदींना लाखो पत्रे पाठविली. म. सा. प. शाहुपुरी शाखेने लाखो पत्रे पाठवून पंतप्रधान कार्यालयाला दखल घेण्यास भाग पाडले.

पुस्तकांच्या गावाला, भिलारला मा. मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस आले तेव्हा म.सा.प.च्या कार्याध्यक्षांनी त्यांना भेटून निवेदन दिले, चर्चा केली. अनेक मान्यवर साहित्यिकांनी, प्राध्यापकांनी या प्रश्नासाठी विभागवार बैठका घेऊन विचारमंथन केले. पण अजूनही मराठी 'अभिजात भाषा' झालेली नाही. साहित्य अकादमीने नेमलेल्या समितीनेही पठारे समितीच्या अहवालावर अनुकूल अभिप्राय नोंदवलेला आहे. हा प्रश्न का सुटत नाही, याविषयी जबाबदार लोकांनी निवेदन केले पाहिजे.

मराठी शाळांचा घसरणारा दर्जा, नवीन मराठी शाळांना मान्यता मिळत नाही आणि इंग्रजी माध्यमाच्या दर्जाहीन शाळांची बेसुमार वाढलेली संख्या यामुळे महाराष्ट्रातील मराठी माध्यमांच्या शाळांची अवस्था दयनीय आहे. इंग्रजी माध्यमातील शिक्षणाला आलेले अतोनात अवास्तव महत्त्व, इंग्रजी आले नाही तर नोकरी मिळणार नाही आणि इंग्रजी अस्खलीत बोलता येणे ही आधुनिकतेची कसोटी हा अपसमज यामुळे बहुसंख्य पालक आपल्या पाल्यांना इंग्रजी माध्यमाच्या शाळेत घालतात. या शाळांमध्ये जुजबी मराठी शिकविले जाते. परिणामी मराठी भाषेपासून हे विद्यार्थी तुटत जातात. आपली मातृभाषा तिच्या भिन्न बोलींसहित आपल्याला बोलता यावी, असे या पिढीला वाटत नाही. मग प्रमाणभाषेत लिहिणे तर दूरच! प्रसारमाध्यमांमध्येही मराठीची प्रदूषित रूपेच प्रसारित केली जातात. राजकारणासाठी भाषेचा कैवार घेतला जातो. इतर भाषांमधील पाट्यांवर काळे फासले जाते. मराठीमध्ये पाटी म्हणजे देवनागरी लिपीत पाटी, असा आंदोलनकर्त्यांचा समज! ज्यांना लिपी आणि भाषा यांतील फरक कळत नाही, त्यांच्याबद्दल काय बोलावे?

मराठीला अभिजात दर्जा मिळाल्याने मराठीप्रेमींना भाषा संवर्धनासाठी प्रयत्न करण्यास हुरूप येईल. मराठीभाषिकांना दिलासा मिळेल. शेतकऱ्यांचे कर्ज या सरकारने माफ केले हा निर्णय चांगलाच; परंतु स्वामीनाथन आयोगाच्या शिफारशी लागू केल्या तरच शेतकरीहिताचा निर्णय झाला, असे म्हणता येईल. याच धर्तीवर अभिजात दर्जा तर हवाच; परंतु मराठी माध्यमांच्या शाळांसाठी विशेष धोरण, राज्यात मराठीची सक्ती आणि मराठी माध्यमात शिक्षण घेतलेल्यांना



अनुक्रमणिका






उपजीविकेची साधने उपलब्ध होतील हे पाहणे राज्यकर्त्यांचे कर्तव्य असायला हवे. अस्खलीत मराठीतच बोलणे, मराठीत लिहिणे आणि मराठीचे वैभव नवीन पिढीस समजावून देणे ही कार्ये निष्ठेने केली पाहिजेत. 'मराठी भाषा : संचित आणि नव्या दिशा' - मराठीच्या विकासाचा सम्यक व सखोल शोध, या लेखामधून नीलिमा गुंडी यांनी वरील ग्रंथाचा परिचय करून दिला आहे. हा ग्रंथ प्रत्येक मराठीप्रेमीने वाचलाच पाहिजे आणि त्यावर चिंतन केले पाहिजे. मराठी व्याकरणतज्ज्ञ आणि भाषातज्ज्ञ यास्मिन शेख यांचे जीवनगौरव पुरस्कार स्वीकारताना व्यक्त केलेले मनोगत मराठी भाषेची स्थिती बदलण्यासाठी काय करावे लागेल याचे मार्गदर्शन करते.

गेल्या एप्रिल महिन्यात रामनाथ चव्हाण यांचे निधन झाले. 'भटक्या विमुक्तांची जातपंचायत' या पंचखंडातील बृहद् संशोधन प्रकल्पामुळे रामनाथ चव्हाण यांनी दलित साहित्यातच नव्हे तर समाजशास्त्रीय संशोधनक्षेत्रात मोठी भर घातली. 'साक्षीपुरम', 'बामणवाडा', 'सत्यशोधक महात्मा' ही चव्हाणांची गाजलेली नाटके. कोणतेही साहाय्य नसताना, नोकरी करून, स्वखर्चाने भटक्या विमुक्तांच्या पालावर जाऊन केलेले संशोधन मराठी साहित्यात तरी अपवादात्मकच! रामनाथ चव्हाणांना 'महाराष्ट्राचा एन्थोवेन' असे संबोधणारे ज्येष्ठ विचारवंत भाई वैद्य यांनी 'रामनाथ चव्हाणांना 'भटक्या विमुक्तांची जातपंचायत' या संशोधनासाठी 'सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाने 'डी. लिट.' पदवी द्यायला हवी होती', अशी खंत व्यक्त केली होती. त्यांच्या वाट्याला पुरस्कारापेक्षा उपेक्षाच अधिक आली. या व्रतस्थ संशोधकाला आदरांजली! आपल्या स्वर्गीय गायकीने आयुष्य समृद्ध करून टाकणाऱ्या गानतपस्वी किशोरीताई आमोणकर आणि अभिनेत्री रिमा लागू यांचे दुःखद निधन झाले. म.सा.प. पत्रिकेतर्फे आदरांजली.

या ३५९व्या अंकामध्ये शरद जोशींच्या असामान्य कर्तृत्वावर प्रकाश टाकणाऱ्या वसुंधरा काशिकर-भागवत आणि भानू काळे यांनी लिहिलेल्या ग्रंथांवर वंदना बोकील-कुलकर्णी आणि हरी नरके या लेखकांनी परीक्षणे लिहिली आहेत. शेतकऱ्यांचे अर्थशास्त्र समजावून सांगणारे आणि शेतकरी संघटनेच्या माध्यमातून प्रखर संघर्ष करणारे शरद जोशी यांचे व्यक्तिमत्त्व आणि कर्तृत्व वाचकांना कळेल. समीक्षक आनंद पाटील यांचा 'नात्यात्मक समीक्षेवरील' लेख मराठी समीक्षेसंदर्भात नव्या परिप्रेक्ष्यात विचार करायला प्रवृत्त करेल. विज्ञान परिषदेच्या ५०वर्षांच्या कार्याचा परिचय म. ना. गोगटे यांच्या लेखातून होईल. नागनाथ कोत्तापल्ले यांचा ऐश्वर्य पाटेकर यांच्या 'जू' या आत्मचरित्रावरील लेख, लक्ष्मीकांत देशमुख यांच्या 'मृगतृष्णा' या कथासंग्रहावरील लेख आणि विद्या सुर्वे-बोरसे यांचा 'फेसबुक आणि मराठी साहित्य' हे लेख रसिकांना वेगळी मर्मदृष्टी देतील.

२७मे ला म.सा.प.च्या वर्धापनदिनानिमित्त ग्रंथ, ग्रंथकारांना आणि प्रकाशकांना विविध पुरस्कार देण्यात आले.

सर्व पुरस्कार विजेत्यांचे हार्दिक अभिनंदन! म.सा. पत्रिकेचे माजी संपादक आणि साहित्य परिषदेचे ज्येष्ठ कार्यकर्ते प्रा. डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांना डॉ. भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार देण्यात आला. म.सा. पत्रिका आणि परिषदेमध्ये निष्ठापूर्वक काम करून संस्थेच्या नावलौकिकात भर घालणाऱ्या 'सुप्र'ना हा पुरस्कार मिळतो आहे, याचा सार्थ अभिमान आम्हाला आहे. डॉ. सु. प्र. कुलकर्णी तसेच डॉ. यास्मिन शेख यांचे हार्दिक अभिनंदन!

म.सा. पत्रिकेची पृष्ठसंख्या मर्यादित असल्याने वाचकांचा पत्रव्यवहार छापणे सध्या शक्य नाही. गेल्या अंकातील डॉ. सतीश बडवे यांच्या लेखावरील प्रतिक्रियेचे डॉ. शकुंतला क्षीरसागर यांचे पत्र डॉ. बडवे यांच्याकडे पाठवले आहे. डॉ. क्षीरसागर तसेच इतर पत्रलेखकांचे आभार!

हा अंक आपल्याला नेहमीप्रमाणे आवडेल आणि मराठीला अभिजात भाषा दर्जा लवकरच मिळेल अशी आशा व्यक्त करतो.

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका








# महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणे - ४११०३०.

## वार्षिक सर्वसाधारण सभेची सूचना

दि. ३०/६/२०१७

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक सर्वसाधारण सभा सोमवार दि. २१ ऑगस्ट २०१७ रोजी पुणे येथे परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात दुपारी ४.३० वाजता परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित करण्यात आली आहे. या सभेला सभासदांनी वेळेवर उपस्थित राहून सहकार्य करावे, अशी विनंती आहे. सभेत खालीलप्रमाणे कामकाज होईल.

### सभेत करावयाची कामे

१. श्रद्धांजली
२. मागील सभेचे इतिवृत्त वाचून संमत करणे.
३. २०१६-२०१७ या वर्षाचे कार्यवृत्त संमत करणे.
४. २०१६-२०१७ या वर्षाचे ताळेबंद आणि उत्पन्न-खर्चपत्रक संमत करणे.
५. २०१७-२०१८ चा अर्थसंकल्प संमत करणे.
६. २०१७-२०१८ करिता हिशेब तपासनीसांची नेमणूक करणे.
७. अध्यक्षांच्या परवानगीने येणारे आयत्या वेळचे विषय.

आपला,
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह

**विशेष सूचना**

१. पुरेशी गणसंख्या नसल्यास सभा १५ मिनिटे स्थगित करण्यात येईल व नंतर ती रीतसर सुरू होईल. त्या वेळी गणसंख्येचे बंधन असणार नाही.
२. वरील कामकाजासंबंधी सभासदांस काही सूचना करावयाच्या असतील वा ठराव मांडायचा असेल तर लेखी स्वरूपात तसे १० ऑगस्ट २०१७ पर्यंत कळवावे. नंतर आलेल्या सूचनांचा विचार केला जाणार नाही.



अनुक्रमणिका



श्रद्धांजली

## अरुण खोरे

'बुद्ध धम्माची दीक्षा घेऊन गावी आलेल्या वडील व चुलत्यांमध्ये मोठा बदल झाला. पोतराज म्हणून जन्मापासून डोक्यावर राखलेले केस चुलत्यांनी कापून टाकले. त्यासाठी भावकीचा मोठा विरोध पत्करला. लोक म्हणाले, 'देवाचं झाड डोक्यावर उगवलं तेच नामदेव व खेतर या दोघा भावांनी कापून टाकले. देवी त्यांना बघून घेईल. आयुष्यात त्यांच्या कुटुंबाचं चांगलं होणार नाही...' वडील व चुलत्यांना पिढ्यान्‌पिढ्या डोक्यावरचे ओझं खाली उतरल्याचे समाधान झाले.

या बदलाबरोबरच दुसराही बदल घरात झाला. भिंतीवर गौतम बुद्ध आणि बाबासाहेबांचे फोटो घरात लावले गेले आणि रोज बुद्धवंदना घरात होऊ लागली.''

गेल्या वर्षी 'लोकशाहीसाठी समंजस संवाद' या माझ्या नियतकालिकाच्या 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर विशेषांका'साठी रामनाथ चव्हाण यांनी जो लेख लिहिला होता, त्यातील दोन उतारे मुद्दाम येथे उद्धृत केले आहेत. आंबेडकरांच्या नेतृत्वाखाली देशातील दलित वर्गाने मोठ्या प्रमाणात बुद्ध धम्म स्वीकारून आत्मसन्मानाचा नवा मार्ग अनुसरला. याच वाटेने रामनाथचे वडील आणि चुलते धम्म दीक्षा घेऊन निघाले. त्यानंतर त्यांना बारामती तालुक्यातील कोऱ्हाळे या गावी विषम समाजव्यवस्थेविरुद्ध जो जाच व त्रास सहन करावा लागला, त्याची कहाणी सांगणारा 'बाबासाहेबांसाठी कोऱ्हाळे गाव सोडावे लागले,' हा लेख रामनाथने लिहिला होता. या लेखाच्या निमित्ताने त्याची दोन-तीनदा भेटही झाली. या लेखातील हा पुढचा उतारा रामनाथची एकूण वाटचाल कशी झाली, याकडे लक्ष वेधतो, तो मुद्दाम येथे देतो -

'स्वत:चं जन्मगाव सोडून वडगाव निंबाळकर येथे आम्ही राहात असलो तरी जेव्हा-केव्हा मी माझ्या गावी जातो, जेव्हा आजोबांनी बांधलेल्या घराच्या अंगणात वडील आणि चुलत्यांनी बांधलेल्या आजोबांच्या छोट्या समाधीसमोर क्षणभर उभा राहतो. नम्रपणे आजोबांना अभिवादन करतो आणि त्यांनी बांधलेल्या त्यांच्या घराच्या समोरच्या भिंतीवर लिहिलेल्या दोन ओळी वाचतो - 'शीघ्र कवी, तमाशा कलावंत सखाराम चव्हाण तथा कोऱ्हाळकर यांचे






**मराठी साहित्यात आपल्या बहुतेक समीक्षकांनी रामनाथच्या उदंड साहित्याची जवळपास उपेक्षाच केली असे मला वाटते. मराठी साहित्यातील दलित प्रवाहाला आशयपूर्ण योगदान देण्यात त्याच्या पुस्तकांचे मोल मोठे आहे. नाटककार, कादंबरीकार, कथा-लेखक आणि अभ्यासपूर्ण संशोधक या विविध स्वरूपात त्याने केलेले लेखन हे आपल्याला डावलता येत नाही किंवा दुर्लक्षिता येत नाही. तथापि, मराठी समीक्षकांनी या सर्व योगदानाकडे पक्षपातीपणाने दुर्लक्ष केले असे म्हणावे लागेल.**

निवासस्थान'. या ओळी वाचताना भूतकाळातल्या आठवणी पुन्हा जाग्या होतात. त्याचवेळी गावातली एखादी व्यक्ती जवळ येते आणि खांद्यावर हात ठेवून म्हणते - 'त्या टायमाला गाव सोडलं म्हणून तुमचं चांगलं झालं. नायतर तुमीबी गावगाड्याच्या या चिखलात आजही रुतून बसला आस्ता.'

रामनाथने आत्मचरित्र लिहिण्याचे जवळपास पक्के केले होते. ते त्याने पूर्ण करावे, असा माझ्यासारख्या मित्रांचा आग्रह होता. तथापि, दोन वर्षांपूर्वी उद्भवलेल्या आजारपणामुळे त्याचे लेखन आणि भ्रमंती जवळपास थांबली होती. गेल्या वर्षी डिसेंबर महिन्यात राष्ट्रीय बंधुता संमेलनाच्या वतीने भाई वैद्य यांच्या हस्ते पुरस्कार देऊन रामनाथला गौरविण्यात आले होते. त्यावेळी त्याचे सर्व कुटुंबीय भेटले होते. रामनाथची प्रकृती रोडावलेली होती. आजारपणातून तो उठला होता. तथापि, तब्येत फार सुधारत नव्हती.

अलीकडच्या चार-पाच वर्षांत आमच्या भेटीगाठी वाढल्या होत्या. गेल्या दोन वर्षात रामनाथचे आजारपण वाढत गेले आणि याच वर्षी एप्रिल महिन्यात २० तारखेला सकाळीच तो गेल्याचे समजले आणि मनस्वी दु:ख झाले. वयाच्या पासष्टीत तो हे जग सोडून गेला आणि आम्हा सर्व मित्रांना व कुटुंबीयांना रुखरुख लावून गेला.

मराठी साहित्यात आपल्या बहुतेक समीक्षकांनी रामनाथच्या उदंड साहित्याची जवळपास उपेक्षाच केली असे मला वाटते. मराठी साहित्यातील दलित प्रवाहाला आशयपूर्ण योगदान देण्यात त्याच्या पुस्तकांचे मोल मोठे आहे. नाटककार, कादंबरीकार, कथा-लेखक आणि अभ्यासपूर्ण संशोधक या विविध स्वरूपात त्याने केलेले लेखन हे आपल्याला डावलता येत नाही किंवा दुर्लक्षिता येत नाही. तथापि, मराठी समीक्षकांनी या सर्व योगदानाकडे पक्षपातीपणाने दुर्लक्ष केले असे म्हणावे लागेल.

रामनाथ चव्हाण यांची ओळख मराठी साहित्याला झाली, ती एका छोट्याशा कथासंग्रहामुळे. 'उजाडलं का ?' हा कथासंग्रह १९७९ साली प्रकाशित झाला. दलितांच्या जगण्याचा आणि संघर्षाचा एक प्रवास त्याने आपल्या कथांमधून मांडला होता. याच वर्षी पुण्यात आणि महाराष्ट्रात दलित रंगभूमीच्या संदर्भात काही उपक्रम सुरू झाले होते. या प्रक्रियेतही रामनाथ सहभागी झाला. त्यानंतर त्याच्यातला सामाजिक नाटककार जागा झाला आणि मग काही चांगल्या नाट्यकृती त्याने निर्माण केल्या. या दरम्यान त्याने कादंबरी लेखनही सुरू केले. 'निळी पहाट' आणि 'भंडारा' या दोन कादंबऱ्या त्याने लिहिल्या. दलितांच्या राजकारणाचे चित्रण रामनाथने केले पाहिजे, असे मला सतत वाटत होते. ते मात्र राहून गेले.

देशातील सामाजिक विषमतेच्या प्रश्नांनी घेरलेल्या समाजसमूहांना जे भोगावे लागते, त्याकडे एक लेखक म्हणून रामनाथ पाहत होता. दक्षिण भारतातील मीनाक्षीपुरम येथे काही दलितांनी धर्मांतर केले, त्याची दखल लेखक म्हणून त्याने घेतली. तो तेथे जाऊन आला आणि त्यानंतर 'साक्षीपुरम' हे त्याने लिहिलेले नाटक प्रसिद्ध झाले. यानंतरच्या काळातही त्याच्या नाट्यकृती बहरत होत्या आणि तो लिहीत होता. 'बामनवाडा', 'महात्मा जोतिराव फुले', 'बावरी', 'चक्रवाकी', 'पारध', 'क्रांती निळ्या नभाची', 'सत्यशोधक महात्मा' ही महत्त्वाची नाटके त्याने लिहिली. याखेरीज 'बायको मी देवाची' ही एकांकिकाही त्याने लिहिली होती. 'बामनवाडा'चा प्रयोग ज्येष्ठ समाजवादी नेते व लेखक नानासाहेब गोरे यांनी पाहिला होता आणि जाहीरपणे आपला अभिप्रायही दिला होता.

पददलित आणि

# समीक्षक व लेखक कंपूने नाकारलेला संशोधक-लेखक रामनाथ चव्हाण










शोषित समाजात महिलांचे जे दु:ख विषमतेच्या समाजरचनेमुळे निर्माण होते, त्याकडेही रामनाथ चव्हाण नेहमीच लक्ष वेधतात आणि आपल्या पुस्तकातूनही ते अधोरेखित करत आले आहेत. 'बावरी', 'चक्रवाकी', 'पारध' या नाटकांतून त्यांनी आपली ही स्त्रीवरच्या अन्यायाची भूमिका मांडण्याचा प्रयत्न केला आहे. एकूणच नाटकाचे माध्यम रामनाथला गवसले होते, तथापि, नंतर दलित रंगभूमी क्षीण झाल्यामुळे त्याच्या नाटकाचे प्रयोग फारसे झाले नाहीत.

इथे एक संदर्भ आवर्जून सांगू इच्छितो. दलित साहित्यविषयक संस्थेच्या संदर्भात भारताचे तत्कालीन उपराष्ट्रपती के.आर.नारायणन यांना भेटायला आम्ही नवी दिल्लीत गेलो होतो. त्यांच्या निवासस्थानी रामनाथचा परिचय करून देताना, यांनी धर्मांतरावर नाट्यरूपाने लिहिले आहे, असे मी उपराष्ट्रपतींना सांगितले. त्यावर नारायणन यांनी आवर्जून मीनाक्षीपुरम, साक्षीपुरम याबाबत आस्थेने माहिती विचारली. त्यानंतर आम्ही तिघांनी एकत्र फोटोही काढला. रामनाथ उपराष्ट्रपतींच्या आपुलकीने भारावून गेला होता. हा संदर्भ अशासाठी सांगितला की देशाच्या घटनात्मक पदावर असलेल्या मान्यवरांनाही या विषयाचे महत्त्व लक्षात येत होते, मात्र आमचे मराठी समीक्षक त्याकडे दुर्लक्ष करीत होते. (अपवाद आमचे स्नेही डॉ.वि.भा.देशपांडे, मंगेश तेंडुलकर आणि सुरेशचंद्र पाध्ये यांचा). त्याचे एकूण प्रेम नाट्यलेखनावर अधिक होते, हे आम्हाला जाणवायचे, तथापि, प्रयोग सादरीकरणाच्या पातळीवर मोठ्या प्रमाणात अडचणी असल्याचे तो सांगायचा.

रामनाथने समाजशास्त्रीय भूमिकेतून संशोधन करून जे लेखन केले, ते खूप महत्त्वाचे आहे. मराठीत त्याच्या या साहित्याचे वेगळेपण आवर्जून नोंदवायला हवे. मुख्यत: भटक्या जाती आणि जमातींच्या समूहात जागृती येत असताना, लक्ष्मण माने यांच्यासारखे नेते पुढे येत असताना रामनाथने हे जे लेखन केले, त्याचे मोल मला अधिक वाटते. 'जाती आणि जमाती' या शीर्षकाचे त्याचे पहिले पुस्तक मुख्यतः मुलाखतींच्या आधारे तयार केलेले होते. त्या पाठोपाठ आलेले 'भटक्या-विमुक्तांचे अंतरंग' हे पुस्तकही त्याच स्वरूपाचे होते. या पुस्तकांच्या निमित्ताने त्याने अगोदर पुण्यातील 'तरुण भारत' या दैनिकात या विषयावर नियमित स्तंभलेखन केले होते. हे दैनिक संघविचारांशी निगडित असल्यामुळे साहजिकच रामनाथच्या लेखनाकडेही अन्य मोठ्या वृत्तपत्रांचे दुर्लक्ष झाले होते. तथापि, रामनाथने आपले लेखन आणि भ्रमंती अतिशय कष्टाने व चिकाटीने सुरू ठेवली होती. या कामासाठी त्याला कोणतीही शिष्यवृत्ती मिळत नव्हती. तो हमाल-मापाडी मंडळात काम करीत होता आणि दर रविवारची सुटी तो मुलाखतीसाठी या भटक्यांच्या पालावर घालवायचा. हे सगळे काम तो जिद्दीने आणि एकट्याने पूर्ण करत होता.

या नंतरच्या काळात 'सकाळ'मध्ये रामनाथचे 'घाणेरीची फुलं' हे उपेक्षित बालकांच्या कथा सांगणारे सदर रविवारच्या पुरवणीत प्रसिद्ध होऊ लागले. ते संपल्यावर 'वेदनेच्या वाटेवरून', 'जगण्यासाठी', 'बिन चेहऱ्याची माणसं' अशी अनेक सदरे प्रसिद्ध झाली. या सदरांची पुस्तकेही वाचकांना अतिशय भावली.

मी वर उल्लेख केल्याप्रमाणे समाजशास्त्रीय भूमिकेतून त्याने जे लेखन जवळपास एक तप (साधारणत: २००२ ते २०१४-१५) केले, त्याचे पाच ग्रंथ आज संदर्भाच्या दृष्टीने फार मोलाचे आहेत. समाजशास्त्रीय अशा पद्धतींनी कदाचित या ग्रंथांचे वेगळेपण लक्षात येणार नाही, तथापि, त्या मागची रामनाथ चव्हाणांची अभ्यासाची, संशोधनाची तळमळ लक्षात घेतली तर एका उपेक्षित समाजसमूहाचे अवघे जीवन त्यांनी कसे समोर आणले, हे ठळकपणे जाणवू शकेल. 'भटक्या-विमुक्तांची जातपंचायत' या शीर्षकाचे एकूण पाच ग्रंथ अभ्यासपूर्ण रीतीने लिहून त्यांनी ते पूर्ण केले. भटक्या आणि विमुक्तांच्या विविध जातपंचायतीमधून स्त्रीला आणि दुबळ्यांना कसे नाडले जाते, कुप्रथांमध्ये कसे अडकविले जाते आणि त्यातून त्यांचे कायमस्वरूपी शोषण कसे केले जाते, यांवर रामनाथने या ग्रंथांमधून प्रकाश टाकला आहे. रामनाथच्या अंत्यविधीप्रसंगी बोलताना ज्येष्ठ नेते भाई वैद्य यांनी तर या अभ्यासासाठी व ग्रंथांसाठी विद्यापीठाने रामनाथला डी.लिट. ची पदवी द्यायला हवी होती, असे जाहीरपणे सांगितले. यातली व्यथा आपण समजून घेतली पाहिजे. आपल्या किरकोळ अभ्यासाचे, सुमार पुस्तकांचे मार्केटिंग करणारे अनेकजण आजच्या काळात दिसतात. अशा वेळी शांतपणे व निरलसपणे आपले लेखन करून कोणतीही अपेक्षा न धरणारे रामनाथ चव्हाण यांना नीटपणे न्याय मिळाला नाही, हे स्पष्टच आहे.

सुदैवाने सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाच्या लोकशाहीर अण्णा भाऊ साठे या अध्यासनाच्या संचालकपदी रामनाथची नियुक्ती करण्यात आली. त्यानंतर आपण सर्वजण त्यांना 'प्राध्यापक रामनाथ चव्हाण' म्हणून ओळखू लागलो. या अध्यासनाला त्याच्या उपक्रमशीलतेमुळे एक स्थिरता मिळाली. जवळपास आठ



**रामनाथच्या अंत्यविधीप्रसंगी बोलताना ज्येष्ठ नेते भाई वैद्य यांनी तर या अभ्यासासाठी व ग्रंथांसाठी विद्यापीठाने रामनाथला डी.लिट. ची पदवी द्यायला हवी होती, असे जाहीरपणे सांगितले. यातली व्यथा आपण समजून घेतली पाहिजे. आपल्या किरकोळ अभ्यासाचे, सुमार पुस्तकांचे मार्केटिंग करणारे अनेकजण आजच्या काळात दिसतात, अशा वेळी शांतपणे व निरलसपणे आपले लेखन करून कोणतीही अपेक्षा न धरणारे रामनाथ चव्हाण यांना नीटपणे न्याय मिळाला नाही, हे स्पष्टच आहे.**

वर्षे (२००७ ते २०१५) त्याने या अध्यासनाचे काम सांभाळले. याखेरीज पुण्यातील डॉ. आंबेडकर रीसर्च फाउंडेशन, नाशिकचे दलित नाट्यसंकुल, पुणे विद्यापीठाची अॅकॅडमिक कौन्सिल, विद्यापीठाचेच प्रौढ शिक्षण अभ्यास मंडळ अशा विविध जबाबदाऱ्या त्यांनी पार पाडल्या. केंद्र सरकारच्या तत्कालीन नियोजन आयोगाचा अभ्यास व कृतिगटाचा सदस्य म्हणूनही त्यांनी तीन वर्षे काम पाहिले. या जबाबदाऱ्यांबरोबरच एक लेखक व नाटककार म्हणून त्यांनी काही महत्त्वाच्या संमेलनांचे अध्यक्षपदही भूषविले- नाशिकला भरलेले अखिल भारतीय दलित नाट्य संमेलन (१९९२), अस्मितादर्श साहित्य संमेलन, परभणी (२०१०), दलित साहित्य विचारवेध संमेलन, पुणे (२०१२) इ. याबरोबरच अमेरिकेतील पहिले विश्व मराठी साहित्य संमेलन (२००९), भटके विमुक्त राज्यस्तरीय चर्चासत्र, कोल्हापूर (२०१०) अशा उपक्रमांतही ते सहभागी झाले. इथे आणखी एक गोष्ट नोंदवितो. गेली दहा-बारा वर्षे रामनाथच्या नाटकांवर आणि अन्य लेखनावर महाराष्ट्रातील विविध विद्यापीठांतून संशोधन प्रबंध लिहिले जात आहेत. ही अतिशय आश्वासक अशी गोष्ट आहे.

रामनाथला स्थानिक आणि राज्यपातळीवरचे अनेक पुरस्कार मिळाले. पुणे महापालिका आणि पुस्तकप्रेमी श्याम पानगंटी यांनी दिलेल्या पुरस्कारांपासून ते राज्य सरकारच्या वाङ्मय पुरस्कारापर्यंत अनेक पुरस्कार त्याला मिळाले. तथापि, राष्ट्रीय पातळीवर मराठी ग्रंथांना पुरस्कार देणाऱ्या अनेक मान्यवर संस्थांनी रामनाथकडे मात्र दुर्लक्ष केले. राष्ट्रीय बंधुता संमेलनासारख्या संस्थेने आस्थेने त्याची दखल घेऊन त्याला वारंवार सन्मानित केले. अर्थात एखाद्या समर्पित लेखकाचे मूल्यमापन अथवा गौरव अशा पुरस्कारांनी होतो, अशी भूमिका येथे नाही. तथापि, तुलनेने कमी महत्त्वाच्या लेखक व संशोधकांना अशा संस्था किती वेळा गौरवतात, हे पाहिल्यावर हा मुद्दा मांडावासा वाटला.

रामनाथ या वर्षी काही काळ दवाखान्यात होता. त्याला भेटायला गेलो तेव्हा त्याने 'गावगाडा - काल आणि आज' हे पुस्तक मला दिले. या पुस्तकाच्या प्रकाशनासाठी शरद पवार आणि मुख्यमंत्री यांना आपण बोलावू, असे मी त्याला सुचविले त्या वेळी त्याची कळी खुलली होती. तब्येत सुधारल्यावर आपण त्यांना भेटायला जाऊ, असेही आमचे बोलणे झाले होते. एकूणच त्याला या पुस्तकाच्या निमित्ताने नवा उत्साह वाटत होता, हे मला जाणवले. शेवटी काळ असतोच, त्याची तारीखही ठरलेली असते. रामनाथने २० एप्रिल २०१७ रोजी आपल्या सर्वांचा निरोप घेतला. मार्च महिन्यात त्याने पासष्टी ओलांडली होती. त्याची तब्येत सुधारेल असे वाटत होते. त्याच्या घरी दोन नातवंडे आली होती, त्याचा आनंदही त्याच्या चेहऱ्यावर दिसत होता.

पुण्यातील कात्रज परिसरातले त्याचे घर आणि त्यातील रामनाथच्या पुस्तकांचा एक हॉल हे आमचे नेहमीचे भेटीचे ठिकाण. या पुस्तकांचे जतन करणे हे आपले काम आहे. त्याच्या कुटुंबीयांना यासाठी सहकार्य करण्याची गरज आहे. त्याच्याशी या ग्रंथघरात बसून बोलताना अनेक पुस्तकांचे विषय पुढे यायचे. त्याच्या संकल्पातील त्याचे आत्मचरित्र आता राहून गेले आणि संस्थात्मक पातळीवर काम करताना मी त्याला सुचविलेले अण्णा भाऊ साठे यांचे अद्ययावत चरित्रलेखनही होऊ शकले नाही. ही खंत एक रुखरुख म्हणून कायम राहील. विशेषत: त्याच्या आत्मचरित्राची जुळवाजुळव सुरू असतानाच परमात्म्याने त्याला बोलाविले ही त्याचीच इच्छा !

रामनाथ इतक्या लगेच जाईल, हे वाटत नव्हते, मात्र डॉक्टरांना आणि कदाचित त्याच्या कुटुंबीयांना त्याची चाहूल लागली होती. मी मात्र तेथून खूप दूर होतो!

◆

**अरुण खोरे**
ई-मेल : arunkhore@gmail.com
चलभाष : ९६०४००१८००



अनुक्रमणिका



भाषण

## यास्मिन शेख

■ ■

**व्याकरण हा माझा आवडीचा, अभ्यासाचा आणि ध्यासाचा विषय आहे. मुंबईच्या एस.आ.ई.एस. महाविद्यालयात विद्यार्थ्यांना व्याकरण शिकवत असताना असं लक्षात आलं, व्याकरण या विषयाला भाषाविज्ञानाची जोड दिल्याशिवाय खऱ्या अर्थाने भाषेचं शास्त्रशुद्ध स्वरूप कळणार नाही. डेक्कन कॉलेजच्या दोन उन्हाळी वर्गांना मी उपस्थित राहिले आणि भाषेच्या स्वरूपावर एक वेगळाच प्रकाश पडला, असं मला जाणवलं. भाषाशास्त्रामुळे भाषेच्या पोटात शिरून तिचं खरं स्वरूप उलगडता येतं.**

■ ■

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अध्यक्ष माननीय डॉ. रावसाहेब कसबे, कोषाध्यक्ष माननीय सुनीताराजे पवार, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह श्री. प्रकाश पायगुडे, परिषदेचे सर्व उपस्थित कार्यकर्ते, ज्येष्ठ विचारवंत प्रा. पुष्पा भावे आणि सर्व मराठीप्रेमी जनहो, आजचा दिवस अत्यंत आनंदाचा आहे. महाराष्ट्र साहित्य परिषदेचा १११वा वर्धापन दिन आज २७ मे रोजी साजरा होत आहे. मराठी भाषेच्या रक्षणासाठी आणि संवर्धनासाठी परिषद इतकी वर्षं अविरतपणे आणि निष्ठेने कार्य करत आहे. ही मराठीच्या संदर्भात अत्यंत मोलाची कामगिरी आहे.

मसापतर्फे दरवर्षी मराठी भाषा आणि साहित्य यांसाठी बहुमोल योगदान देणाऱ्या व्यक्तीला हा जीवनगौरव पुरस्कार प्रदान करण्यात येतो असं जेव्हा प्रा. मिलिंद जोशी यांनी काही दिवसांपूर्वी दूरध्वनीवरून मला सांगितलं, तेव्हा वाटलं, की त्या समारंभाला मी उपस्थित राहावं किंवा बोलावं असं त्यांना सांगायचं असावं. पण ते पुढे म्हणाले, ''आपण मराठी भाषेच्या संदर्भात भाषाशास्त्र आणि व्याकरण या विषयांसाठी जीवन वाहून घेतलंत. आपल्या ह्या निरपेक्ष सेवेचा आणि तळमळीचा सन्मान या जीवनगौरव पुरस्काराच्या रूपाने आम्ही करणार आहोत.'' हे ऐकल्यावर काय बोलावं हेच मला सुचेना. 'अहो, मी विशेष काही केलं नाही,' असं काही तरी मी म्हणाले. त्यांनी हा पुरस्कार मी स्वीकारावा अशी विनंती केली. मला आनंद झाला; पण खरं सांगते, मला फार संकोचल्यासारखं झालं. आज ज्येष्ठ विचारवंत प्रा. पुष्पा भावे यांच्या शुभहस्ते हा पुरस्कार स्वीकारण्याचं भाग्य मला लाभलं, याचा मला आनंद वाटतो. या वर्षी या जीवनगौरव पुरस्कारासाठी माझी निवड करण्यात आली याबद्दल कृतज्ञता व्यक्त करते.

'ज्येष्ठ व्याकरणतज्ज्ञ' असा माझा उल्लेख प्रा. मिलिंद जोशी यांनी केला. मी ज्येष्ठ आहे; पण व्याकरणतज्ज्ञ नाही. व्याकरण हा माझा आवडीचा, अभ्यासाचा आणि ध्यासाचा विषय आहे. मुंबईच्या एस.आ.ई.एस. महाविद्यालयात विद्यार्थ्यांना व्याकरण शिकवत असताना असं लक्षात आलं, व्याकरण या विषयाला भाषाविज्ञानाची जोड दिल्याशिवाय खऱ्या अर्थाने भाषेचं शास्त्रशुद्ध सवरूप कळणार नाही. डेक्कन कॉलेजच्या दोन उन्हाळी वर्गांना (summer School) मी उपस्थित राहिले आणि भाषेच्या स्वरूपावर एक वेगळाच प्रकाश पडला, असं मला जाणवलं. भाषाशास्त्रामुळे भाषेच्या पोटात शिरून तिचं खरं स्वरूप उलगडता येतं.

'व्याकरण' म्हटलं, की सर्वसामान्य मराठी भाषकाच्या कपाळावर आठ्या पडतात. हा अत्यंत रुक्ष विषय आहे. असं बहुतेकांना वाटतं. खरं म्हणजे, हा मुळीच रुक्ष विषय नाही, अत्यंत सुंदर आणि भाषेच्या स्वरूपाच्या संदर्भात ज्ञानात भर घालणारा विषय आहे हा. तो शालेय पातळीवर ज्या तऱ्हेने शिकवला जातो, त्यामुळे या विषयाविषयी तिरस्कार वाटत असावा. तो सोप्या शब्दांत, व्याकरणातील संज्ञा मुलांना समजतील अशी उदाहरणं घेऊन शिकवल्यास, शिक्षकांनीही त्या विषयात रस घेतला, तर व्याकरणाविषयी निश्चितच प्रेम निर्माण होईल याची मला खात्री वाटते. आत्मस्तुतीचा रोष पत्करून एक अनुभव सांगते. एम. ए.च्या विद्यार्थ्यांना भाषाशास्त्र आणि व्याकरण (मराठीच्या संदर्भात) मी शिकवत होते. एम. ए.च्या वर्गात निरनिराळ्या महाविद्यालयांचे विद्यार्थी असतात. मुंबईच्या के. सी. कॉलेजमध्ये संध्याकाळी हे वर्ग भरत. एका संध्याकाळी वर्गात जाण्यासाठी मी जिना चढून वर येत होते. मला बघून चटकन एक विद्यार्थी खाली



अनुक्रमणिका







आला आणि मला म्हणाला, 'हा विषय तुम्ही इतका सुंदर शिकवता, की तुम्ही व्याकरण आणि भाषाशास्त्र आमच्या तळहातावर आणून ठेवलंत. हा विषय आम्हाला खूप कंटाळवाणा वाटायचा; पण आता आम्हांला तो खूप मनोरंजक वाटायला लागलाय.'

व्याकरणासंबंधी आपले अनेक गैरसमज असतात. या संदर्भात आणखी एक अनुभव सांगते.

मी आय. ए. एस.च्या विद्यार्थ्यांना हाच विषय शिकवत असताना, मराठीच्या एक सुप्रसिद्ध लेखिका मराठीचा 'समीक्षा' हा विषय शिकवत होत्या. गप्पांच्या ओघात त्या म्हणाल्या, 'मला मराठीचं व्याकरण-बिकरण काही येत नाही, बरं का! इतका किचकट विषय आहे हा!' मी त्यांना म्हटलं, 'ते जर तुम्हांला येत नसतं, तर तुम्ही इतकं उत्कृष्ट आणि बिनचूक लिहू शकला नसता आणि इतकं सुंदर बोलू आणि शिकवूही शकला नसता. अहो, भाषेमध्येच तिचं व्याकरण अनुस्यूत असतं. आपण आपली भाषा व्यवस्थित बोलतो, याचाच अर्थ आपल्याला त्या भाषेचे नियम माहीत असतात. फक्त ते आपल्याला माहीत आहेत, हे आपल्याला माहीत नसतं, इतकंच.' मराठी शिकवणाऱ्या व्यक्तीनं व्याकरणाविषयी इतका तिरस्कार व्यक्त करावा याचं मला दुःख झालं. विद्यार्थ्यांच्या मनावर या विचाराचा किती प्रतिकूल परिणाम होईल याची खंत वाटली.

असं पाहा, अन्यभाषक मराठी बोलताना चुका करतात. त्या ऐकल्यावर आपल्याला ताबडतोब त्या चुका कळतात. एखादा गुजराती गृहस्थ 'आम्ही काल आले होते', असं म्हणाला, तर आपण मनातल्या मनात ती चूक सुधारतो. अलीकडच्या दूरचित्रवाणीच्या एका मालिकेत एक हिंदी भाषिक अभिनेता 'तुम्ही जिंकू शकतो लाखोंची बक्षिसं' असं म्हणतो, ते ऐकून आपल्याला- मराठी भाषकांना- हसू येतं, ती चूक लागलीच आपल्या लक्षात येते. 'तुम्ही जिंकू शकाल', असं म्हणायला हवं होतं, असंही आपण मनातल्या मनात म्हणतो. म्हणजेच आपल्या भाषेचं व्याकरण- भाषाविषयक नियम- आपण लहानपणापासूनच आत्मसात केलेले असता- अगदी नकळत पण निश्चितपणे.

दुसरा एक विचार मला सांगावासा वाटतो. प्रमाण भाषेसंबंधी मी अनेकदा बोलले आहे, लिहिलंही आहे. पण पुन्हा एकदा मराठी बांधवांना मला आवर्जून सांगावंसं वाटतं ते मराठीच्या बोलीविषयी. प्रमाण भाषा म्हणजे सुशिक्षित, उच्चवर्णीय यांची भाषा, त्या भाषेत आम्ही का बोलावं वा लिहावं, आम्ही आमच्या बोलीभाषेत लिहिणार, असा आग्रह अनेक जण धरतात. 'आमच्या मराठीच्या बोलीचाच आम्ही लेखनातही वापर करणार', असं म्हणणारे एका अर्थाने प्रमाण भाषेचा द्वेष करतात की काय असं वाटू लागतं. भाषेच्या संदर्भात हे लक्षात घ्यायला हवं, की अस्तित्व असतं ते बोलींना. अगदी सुशिक्षित, विद्वान माणूसही मराठीची एखादी बोलीच बोलीत असतो. त्यामुळे मराठीच्या ज्या विविध बोली आहेत, त्या अशुद्ध आहेत, किंवा खालच्या पातळीच्या आहेत असं कोणताही भाषाशास्त्रज्ञ म्हणणार नाही. बोली या विशिष्ट प्रदेशातील असतात. दर बारा कोसावर भाषा बदलते, म्हणतात. हे तितकं जरी खरं नसलं, तरी प्रदेश, व्यवसाय, जवळ असलेल्या प्रदेशातील इतर भाषांचा प्रभाव, अशा अनेक कारणांमुळे बोली भाषांचं स्वरूप वदलत जातं. मराठीच्या मालवणी, अहिराणी, डांगी, कोल्हापुरी, वैदर्भी अशा कितीतरी बोली अस्तित्वात आहेत. प्रत्येक बोलीचे व्याकरणाचे नियम थोडे वेगळे असतात इतकंच. पण काही बोली इतक्या वेगळ्या असतात; की त्या सामान्य मराठी माणसाला नीटशा कळत नाहीत. उदा. आदिवासी समाजाच्या बोली. अहो, पुण्यातला मराठी माणूससुद्धा पुणेरी बोलीच बोलत असतो. लेखनासाठी विशेषतः औपचारिक, शास्त्रीय, वैचारिक, वर्तमानपत्रांतील बातम्या, अग्रलेख इ.साठी एक प्रमाण भाषा मान्य केलेली असते; तिचे लेखनविषयक नियम नक्की केलेले असतात.

# भाषेला धर्म नसतो, जात नसते

## - यास्मिन शेख



त्यानुसार लेखन करणं आवश्यक आहे. असं करण्यात कोणत्याही बोली भाषेवर अन्याय करण्याचा किंवा तिचा अधिक्षेप करण्याचा हेतू नाही. सर्वांना ते लेखन कळावं हाच त्यामागचा उद्देश आहे. एक लक्षात घ्या, प्रमाणभाषा ही एक संकल्पना (concept) आहे. कोणताही विद्वान, मराठीचा अभ्यासक लेखनासाठी मान्य झालेली प्रमाणभाषा जशीच्या तशी बोलत नाही. प्रत्येकाच्या भाषेच्या अभिव्यक्तीत थोडाफार फरक असतो. त्यामुळे प्रमाणभाषा ही एका विशिष्ट जातीची भाषा आहे, असा समज चुकीचा आहे. भाषेला धर्म नसतो, जात नसते. जगात सर्वत्र लेखनासाठी त्या त्या देशाची प्रमाणभाषाच लेखनासाठी वापरतात हे सत्य आहे.

आणखी एका विचारानं माझं मन विषण्ण होतं. आजच्या मराठी भाषेसंबंधी जाणवतं ते तिचं झपाट्याने बदललेलं रूप. दिवसेंदिवस ते अधिकच विद्रूप होत चाललं आहे. मराठी माणसं, विशेषतः तरुण पिढी, दूरचित्रवाणीच्या मराठी मालिकांतील मराठी माणसं इतकं प्रदूषित मराठी बोलतात, की या भाषेला मराठी म्हणावं की नाही, असा प्रश्न पडतो. या बोलण्याचं प्रतिबिंब लिखाणातही उमटतं. हिंदी आणि इंग्रजी शब्दांच्या अतिरिक्त वापरानं आपली मराठी भाषा तिचं सौंदर्यच हरवून बसली आहे.

हिंदीच्या प्रभावानं मराठीत रूढ असलेले अतिशय अर्थपूर्ण शब्दही आपण उपटून टाकले आहेत. वानगीदाखल काही शब्द सांगते - 'सहृदय' ऐवजी सहृदयी (हिंदी), 'निर्दय' ऐवजी निर्दयी, 'स्वर्गवासी' ऐवजी स्वर्गीय, 'स्वाभिमान, अभिमान' ऐवजी गर्व, (मराठीत गर्व हा दोष आहे.) 'ती व्यक्ती' ऐवजी तो व्यक्ती, 'मग्न, गुंग' ऐवजी व्यस्त (मराठीत सम विरुद्ध व्यस्त हा शब्द आहे.) 'ग्रंथ प्रकाशन' ऐवजी ग्रंथविमोचन - असे कित्येक शब्द आपण का स्वीकारले आहेत, हेच कळत नाही. तसंच हिंदीच्या स्वीकारामुळे वाक्यरचनाही सदोष झाल्या आहेत. 'मी गणूशी प्रेम करते, माझी मदत कर,' अशा कितीतरी सदोष वाक्यरचना कानावर पडल्या की दाताखाली खडा आल्यासारखं वाटतं.

याशिवाय मराठी बोलण्या-लिहिण्यात होणाऱ्या चुका तर अगणित आहेत. कोट्यधीश ऐवजी कोट्याधीश, दुरवस्था ऐवजी दुरावस्था, अमावास्या ऐवजी अमावस्या, वैविध्य, विविधता ऐवजी वैविध्यता, हतबुद्ध ऐवजी हतबद्ध... अशा किती चुका सांगू? आपली नावंही काहींना बरोबर लिहिता येत नाहीत. हृषीकेश ऐवजी ऋषिकेश, उज्ज्वला ऐवजी उज्वला, रवींद्र ऐवजी रविंद्र, तेजस्विनी ऐवजी तेजस्वीनी, सुशीला ऐवजी सुशिला इत्यादी. इंग्रजीच्या आपल्या भाषेवर झालेल्या आक्रमणावर आता बोलत नाही. त्यावर एक प्रदीर्घ व्याख्यानच द्यावं लागेल.

भाषेच्या संदर्भात आणखी एक चिंतेची बाब म्हणजे मराठी भाषेतून नष्ट झालेल्या म्हणी आणि वाक्प्रचार. भाषेचं हे वैभवच अलीकडे लुप्त होत चाललं आहे. मोजक्या शब्दात मोठा आशय व्यक्त करण्याचं सामर्थ्य म्हणींमध्ये असतं. मानवी समाज, रूढी, परंपरा, माणसांच्या स्वभावातील गुणदोष इत्यादींचं अल्प शब्दांत केलेलं कथन म्हणजे म्हणी. 'पुढच्यास ठेच, मागचा शहाणा', 'थेंबे थेंबे तळे साचे', 'मन चिंती ते वैरी न चिंती' अशा कितीतरी अर्थपूर्ण म्हणी आज मराठी भाषेतून गायब झाल्या आहेत. तसंच, डोळे उघडणे, आकाशपाताळ एक करणे, पालथ्या घड्यावर पाणी, कान फुंकणे, हात दाखवणे असे कितीतरी अर्थ व्यक्त करणारे वाक्प्रचार बोलण्यातून आणि लेखनातूनही हद्दपार झाले आहेत. त्यांचा पुन्हा भाषेत अंतर्भाव होणं आवश्यक आहे. आणि नवे वाक्प्रचार, नव्या म्हणी यांची भर घालून आपण आपली भाषा समृद्ध केली पाहिजे असं मला मनापासून वाटतं.

१७ मे २०१७ च्या 'सकाळ' या वृत्तपत्रात 'पश्चिम बंगालमध्ये बंगालीची सक्ती' ह्या शीर्षकाखाली आलेली बातमी वाचली. उपशीर्षक होतं- 'राज्यसरकारचा प्रस्ताव, शाळांनाही सवलत नाही.' बातमी अशी होती - 'पश्चिम बंगालमध्ये शिकणाऱ्या प्रत्येक विद्यार्थ्याला बंगाली भाषा शिकणे सक्तीचे असेल', असे आज राज्यसरकारने सांगितले. राज्यसरकारच्या या नव्या प्रस्तावानुसार सर्व शिक्षणमंडळांच्या शाळांनी पहिली ते दहावी- तीन भाषा शिकवाव्यात. आणि त्यामध्ये बंगालीचा समावेश असणे आवश्यक आहे.'

यावर याच वृत्तपत्रात प्रतिक्रिया वाचली -

'पुणेः बंगाली भाषेचे संवर्धन करण्यासाठी पश्चिम बंगाल सरकारने राज्यातील शाळांमध्ये या भाषेचे शिक्षण सक्तीचे करण्याचा निर्णय घेतला. तसेच, यापूर्वी कन्नड व मल्याळम भाषांच्या शिक्षणाची सक्ती संबंधित राज्यांमध्ये करण्यात आली आहे. यापासून महाराष्ट्र सरकारने बोध घ्यावा आणि मराठीच्या संवर्धनासाठी प्रयत्न करावेत, अशी मागणी महाराष्ट्र सांस्कृतिक आघाडीचे संयोजक डॉ. श्रीपाद जोशी यांनी मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस आणि शिक्षणमंत्री विनोद तावडे यांच्याकडे पत्राद्वारे केली आहे.' डॉ. श्रीपाद जोशी हे अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष आहेत. त्यांनी 'अतिथी संपादकीय' या सदराखाली आपलं मत व्यक्त केलं आहे. शीर्षक आहे 'मराठीसाठीही दाखवा इच्छाशक्ती'. या लेखात त्यांनी मातृभाषेचं महत्त्व पटवून दिलं आहे. 'प्राथमिक-माध्यमिक शिक्षणात मराठी भाषा अनिवार्य करण्याचे पाऊल मराठीनेही ठामपणे उचलण्याची गरज आहे. प्रश्न हा आहे की विद्यमान राज्यकर्त्यांची तरी तशी राजकीय इच्छाशक्ती आहे काय याचाच.''

माझं यावर एवढचं म्हणणं आहे, की बंगाली भाषेची शाळांमध्ये सक्ती करणार ही बातमी वाचून आम्ही जागे



अनुक्रमणिका

होणार का? याआधीच मराठी भाषेचं रक्षण करणाऱ्यांना मराठी भाषा ही इतर माध्यमांच्या शाळेत सक्तीची करावी असं का वाटलं नाही? इंग्रजी माध्यमांच्या शाळा महाराष्ट्रात वाढताहेत, मराठी माध्यमांच्या शाळा बंद करण्याचे निर्णय घेतले जात आहेत, इंग्रजी माध्यमांच्या शाळांत विद्यार्थी फ्रेंच, जर्मन घेतात, मराठीकडे ढुंकूनही पाहत नाहीत. आपल्या मुलांनी मातृभाषेतून बोललं पाहिजे असंही पालकांना वाटत नाही, हे आपल्या मराठीचं दुर्दैव होय! इंग्रजी माध्यमांच्या शाळांची जी चलती होत आहे, त्याला जबाबदार कोण? आज इंग्लिशवर प्रभुत्व मिळवणाऱ्याला चटकन नोकरी मिळते, समाजाकडून त्याला प्रतिष्ठा मिळते. इंग्रजी नीटसं न येणाऱ्या मराठी तरुणाला तुच्छतेनं वागवलं जातं, त्यामुळे त्याच्या मनात न्यूनगंड तयार होतो, तो कितीही बुद्धिमान असला तरी त्याची किंमत शून्य असते. त्यामुळे आपल्या मुलांच्या भवितव्याचा विचार करून पालक आपल्या मुलांना - त्यांना आर्थिक दृष्ट्या परवडत नसलं तरी इंग्रजी माध्यमांच्या शाळांतच घालतात, हे सत्य आहे. पण मातृभाषेची उपेक्षा केल्यामुळे शिक्षणाचाही दर्जा खालावतो, हेही आपल्या ध्यानात येत नाही.

मराठी ही केवळ माझी भाषा नाही, ती केवळ तुमची भाषा नाही, ती आपली भाषा आहे. 'आपण' या संज्ञेत समाविष्ट झालेली प्रत्येक व्यक्ती, म्हणजे मराठी बोलणारी व्यक्ती, ही इतर भाषकांपेक्षा आपल्याला अधिक जवळची आहे. अशा भाषिक ऐक्यामुळेच जवळीक निर्माण होते. ज्या भाषेने आपल्या जीवनाची सुरुवात झाली, ज्या भाषेतून आपण आपले अनुभव, भावना, विचार व्यक्त करत आलो, ती आपली मराठी भाषा. सामाजिक दृष्ट्या भाषा हा आद्य आणि सर्वश्रेष्ठ संस्कार आहे. त्यामुळे मराठी भाषेच्या - आपल्या मराठी भाषेच्या रक्षणासाठी, संवर्धनासाठी सर्व मराठी-भाषाप्रेमींनी आवाज उठवला पाहिजे. विशेषतः तरुण पिढीने प्रामुख्याने आपली मातृभाषा व्यवहारात, लेखनात तिचा सुंदर रूपात योजायला हवी. तरुण पिढी मराठी बोलताना त्या भाषेची जी चिरफाड करतात, त्यामुळे मराठी भाषेच्या भवितव्याबद्दल मनात प्रश्नचिन्ह उभं राहतं.

मसापच्या १११व्या वर्धापनदिनाच्या या उत्सव सोहळ्यात मला सहभागी होता आलं, हे माझं भाग्य आहे. या निमित्तानं परिषदेच्या कार्यकर्त्यांना मला असं सांगावंसं वाटतं, या परिषदेने इतकी वर्षं मराठी भाषेची सेवा केली, मराठीच्या प्रेमापोटी जे अनेक उपक्रम केले आणि आजही सातत्यानं करत आहेत, हे खरोखर प्रशंसनीय आहे. मसापच्या ग्रंथालयाचा कायापालट झाल्याचं २५ मेच्या 'सकाळ'मध्ये वाचलं. ग्रंथालयाचं नूतनीकरण होणार ही अत्यंत उत्साहवर्धक घटना आहे. विद्यार्थी, संशोधक, वाचक यांची संख्या दिवसेंदिवस



**आणखी एका विचारानं माझं मन विषण्ण होतं. आजच्या मराठी भाषेसंबंधी जाणवतं ते तिचं झपाट्याने बदललेलं रूप. दिवसेंदिवस ते अधिकच विद्रूप होत चाललं आहे. मराठी माणसं, विशेषतः तरुण पिढी, दूरचित्रवाणीच्या मराठी मालिकांतील मराठी माणसं इतकं प्रदूषित मराठी बोलतात, की या भाषेला मराठी म्हणावं की नाही, असा प्रश्न पडतो. या बोलण्याचं प्रतिबिंब लिखाणातही उमटतं. हिंदी आणि इंग्रजी शब्दांच्या अतिरिक्त वापरानं आपली मराठी भाषा तिचं सौंदर्यच हरवून बसली आहे.**

वाढत आहे, हे वाचून तर मला अतिशय आनंद झालाः आजच्या 'सकाळ'मध्ये (२७ मेच्या) डॉ. नीलिमा गुंडी यांनी 'महाराष्ट्र साहित्य परिषद - एक आधारवड' या शीर्षकाखाली मसापच्या १११ वर्षांच्या मराठी विकासाच्या उपक्रमांचा आढावा घेतला आहे. 'लेखक तुमच्या भेटीला', 'अनुवाद कार्यशाळा', 'भाषा शिक्षक मेळावा' असे किती तरी नवे उपक्रम मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी आपल्या कारकिर्दीत राबवले आहेत. खरं म्हणजे त्यांच्या या कर्तृत्वाला पुरस्कार द्यायला हवा, असं मला मनापासून वाटतं. डॉ. नीलिमा गुंडी यांनी लिहिलेल्या लेखाच्या शीर्षकात एका शब्दाची भर घालते-

'महाराष्ट्र साहित्य परिषद - एक चिरतरुण आधारवड'. मसापला मला एकच सुचवावंसं वाटतं, त्यांनी जे अनेक उपक्रम मराठीच्या संवर्धनासाठी केलेत, त्यात थोडी भर घालता आली, तर आपल्या मातृभाषेचं भवितव्य उज्ज्वल होईल असा मला विश्वास वाटतो. तरुण पिढीला आणि लहान मुलांना मराठी भाषेबद्दल आस्था वाटेल, अभिमान वाटेल असे कार्यक्रम जर आपल्याला करता आले तर 'मराठी भाषा ही माझी मातृभाषा आहे, माझं माझ्या मातृभाषेवर प्रेम आहे, तिचं रक्षण करणं तिची जपणूक करणं, तिचा विकास करणं हे माझं कर्तव्य आहे' ही भावना तरुण, मराठी माणसांमध्ये जागृत व्हायला वेळ लागणार नाही.

मसापच्या सर्व कार्यकर्त्यांना माझे मनापासून धन्यवाद.

जय महाराष्ट्र, जय मराठी!

◆



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

| क्र. | पुस्तकाचे नाव | लेखक/अनुवादक | किंमत |
|---|---|---|---|
| १६ | स्थलांतर, कुणीकडून कुणीकडे | संजॉय हजारिका | १५०.०० |
| १७ | एका सरसेनापतीची कहाणी | जन. के. व्ही. कृष्ण राव | ३००.०० |
| १८ | साध्वी सावित्रीबाई फुले | फुलवंताबाई झांडगं | १००.०० |
| १९ | मी, वसंत साठे | वसंत साठे/ चिंतामणी भिडे | ३३०.०० |
| २० | माझ्या स्वप्नातील भारत | डॉ. एपीजे अब्दुल कलाम / चंद्रशेखर मुरगुडकर | २५०.०० |
| २१ | सुन्न करणारे दिवस | संजय राऊत | १५०.०० |
| २२ | फाळणीच्या शोकांतिका | सरोज कावसजी/ कर्तारसिंग दुग्गल/ चित्रा वाळिंबे | २४०.०० |
| २३ | माझी जमीन माझी मिळकत | संपत डावखर | १३०.०० |
| २४ | ब्लॅक फ्रायडे | एस. हुसैन झैदी/ सायली राजाध्यक्ष | २५०.०० |
| २५ | ...आणि प्राण | अशोक जैन | ३००.०० |
| २६ | सुशीलकुमार -एक प्रवास | रविकिरण साने | ३००.०० |
| २७ | सरदार भगतसिंग (६वी आवृत्ती) | संजय नहार | १७५.०० |
| २८ | Bonding with Kashmir – The Sarhad Story | संजय नहार, प्रशांत तळणीकर | ३९५.०० |
| २९ | नेताजी सुभाष | श्रीराम पचिंद्रे | ३९०.०० |
| ३० | सत्तेच्या परिघातून (आत्मचरित्र) | पी.सी. अलेक्झांडर/विदुला देशपांडे | ५००.०० |
| ३१ | दिलीपकुमार (चरित्र) | बनी रुबेन/ श्याम फरांदे | ४००.०० |
| ३२ | युद्ध आणि शांतताकाळातील भारत पाकिस्तान | जे एन दिक्षीत/ सुवर्णा बेडेकर | ४००.०० |
| ३३ | सीमेपरील सावल्या | शशी थरूर/शहरयार खान/विजय लोणकर | २००.०० |
| ३४ | ज्वालाग्राही पाकिस्तान | एम. जे. अकबर/ रेखा देशपांडे | ४२५.०० |
| ३५ | भुट्टो, रक्तरंजित कहाणी | फातिमा भुट्टो/ चिंतामणी भिडे | ४००.०० |
| ३६ | वेणुंच्या सुरांचे प्रणयाराधन - पं. हरिप्रसाद चौरसिया | उमा वासुदेव/ प्रशांत तळणीकर | ३००.०० |
| ३७ | चंद्र पोरका | राहुल पंडिता / अरुंधती रानडे | २५०.०० |
| ३८ | बृहत भारत | शशी थरूर/ आ.श्री. केतकर | ४५०.०० |
| ३९ | एका मुहाजिराची संघर्षगाथा | अल्ताफ हुसेन/ विजय लोणकर | २००.०० |
| ४० | बियाँड द लाईन्स (आत्मचरित्र) | कुलदीप नय्यर/ सायली राजाध्यक्ष | ५००.०० |
| ४१ | बासरीचा बादशहा | सुरजीतसिंग / प्रशांत तळणीकर | ३५०.०० |


# चिनार पब्लिशर्स



११ ए, ओम गुरुदत्त हौ. सो. चव्हाननगर, धनकवडी, पुणे -४३ महाराष्ट्र

विलास देशमुख :९०४९००१८१६ ऑफीस -०२०-२४३६८६२१

www.chinarpublishers.com, www.amazon.in, www.flipkart.com, www.bookganga.com

Email – chinarpublishers@gmail.com



भाषण

आनंद पाटील

अनपेक्षितपणे मसाप, पुणेचे अध्यक्ष मिलिंद जोशी यांचा फोन आला. 'समीक्षेची समीक्षा' या परिसंवादात डोंबिवलीच्या अ.भा. साहित्य संमेलनात बोला.'' खरी समीक्षाच मराठीत नाही मग बोलायचे कशावर? मुळात समीक्षाच मेली आहे, मग मराठीत नेमके काय आहे? 'मराठी नाटकावरील पाश्चात्त्य प्रभाव १८१८-१९४७ ला मसापचा पुरस्कार देताना वाद होण्याचे कारण 'मराठी नाट्य समीक्षाच नाही' हा एक निष्कर्ष असल्याचे एका परीक्षकाने मला पंचवीस वर्षांनंतर भेट झाली तेव्हा सांगितले होते. शिवाय विलास सारंग यांच्यासारखे विश्वसाहित्य व समीक्षेचे भान ठेवणारे निवडक ज्येष्ठ लेखक याच मताचे होते. टीकावस्त्रहरण, समीक्षाअपहरण व साहित्य विमर्शमरणम् या त्रयीतील पहिल्याला महाराष्ट्र राज्य व दुसऱ्याला मसाप, पुणेचा असे पुरस्कार मिळाल्याने समीक्षाच मराठीत नसल्याची माझी भूमिका अधोरेखित झाली होती. त्यात श्रीपाद जोशी गौरव ग्रंथासाठी तौलनिक संस्कृती अभ्यासातील नव्या प्रवाहासंबंधी माजी संमेलनाध्यक्ष श्रीपाल सबनिसांनी माझ्याकडून लेख लिहून घेतला होता. तो त्यांनी संपादन करताना सवडीने वाचला, तेव्हा 'धक्का' बसला. 'दर्पण'कार जांभेकर स्मारकाला साक्षी ठेवून त्यांनी मला धमकी दिली : ''भाषेच्या प्राध्यापकांना अज्ञानाचे उत्पादक म्हणता. तुमचा निषेधच करू...'' अहो मी येईन मोर्चात, अध्यक्ष महाराज. मी अज्ञानाचा 'इंटरनॅशनल' उत्पादक आहे. श्रीपाद जोशींनी 'उद्याचा मराठवाडा दिवाळी २०१५'साठी त्या विषयावर खास लेख माझ्याकडून लिहून घेतला होता. कुणीही ब्र काढला नाही. अहो, मोर्चाला माणसं मजुरीनं आणावी लागतात. पाखरं ज्या झाडावर वाढतात, त्या वनस्पतीचा रंग धारण करतात. हे साधं जीवशास्त्रीय ज्ञान वा.सी.मर्ढेकरांच्यावरील २५० ग्रंथ व हजारो लेखांत शोधून सापडत नाही. इंग्लंडात चार वर्षे ते आयसीएसच्या प्रश्नपत्रिकेतील २० मार्कांचा कविता लिहिण्याचा प्रश्न सोडवण्यासाठी काव्यलेखन कार्यशाळेत जात होते. 'ॲट प्रेझेंट' या आधुनिक साहित्य सिद्धांतावरील पेपरसाठी काढलेल्या नोट्सची बोटीवर परतताना केलेली जुळणी व अपयशातून सावरणे म्हणजे त्यांचे सौंदर्यशास्त्र! याचा एकही संदर्भ समग्र मराठी समीक्षेत का बरे नाही?

जगातील अज्ञानाच्या उत्पादनाचे सर्वश्रेष्ठ असे हे उदाहरण आहे. मग त्या समीक्षेसाठी दोन साहित्य अकादमीचे व सहा राज्यशासनाचे पुरस्कार दिले गेले? ज्या 'महान समीक्षका'ने आयुष्यात एकही ग्रंथ प्रसिद्ध केला नाही, तरी तो राज्य व दिल्लीच्या पुरस्कार निवड समितीच्या टोळीत वीस वर्षे मिरवतो, तो का? भजनी मंडळांनी वाढवलेली सांस्कृतिक मॅचफिक्सिंगची बिनभांडवली नवजातवादी समीक्षा असणारी भाषा मेली तरी आत्महत्येच्या कड्यावर लोटलेल्या तिच्या रक्षक

# नसलेल्या समीक्षेची समीक्षा आणि 'नात्यात्मक सौंदर्यशास्त्र'













अनुक्रमणिका

शेतकरी, मजुराचा नवा पैसादेखील तिच्या श्राद्धाला वापरू नये. रिकामटेकड्या आस्वादक अफू ॲडिक्टांचा बिनभांडवली प्रतिमा घडवण्या-बिघडवण्याचा सांस्कृतिक कुटिरोद्योग थेट वेद काळापासून सुरू असल्याचे कवी उशनच्या उपेक्षेत स्पष्ट होते. मराठीला सनातन्यांनी छळलेला संत ज्ञानेश्वर व त्याची भावंडे माहीत असतात. त्यांच्यावर कथा, कादंबऱ्या, प्रबंध, चित्रपट तयार होतात. पण पानिपतच्या युद्धात विश्वासरावांच्या खांद्याला खांदा लावून लढायला गेलेल्या पैठणच्या ब्राह्मण सैनिकाची शौर्य गाथा मात्र जुन्या कागदपत्रांतून शोधून काढायला एकविसाव्या शतकातील ॲंग्लो-अमेरिकी संशोधकाची वाट पाहावी लागते. रोड मराठ्याप्रमाणे हा ब्राह्मण योद्धा १२ वर्षे उत्तरेतील खेड्यात होता, गरीब मुसलमानाने त्याला आश्रय दिला होता. तो सत्यवान 'खरा ब्राह्मण' असल्याने जात लपवली नव्हती. तो एका तपाने पैठणला आला. नंतर ओळख परीक्षा झाली, पण त्याला शुद्ध करून घ्यायला पुणे व बनारसच्या शास्त्र्यांनी विरोध केला. पैठणच्या जातबांधवांनी यावर तोडगा काढला. पैठण तेव्हा निजामाच्या राज्यात होते. त्यांनी शुद्धीकरणाची परवानगी रझाकाराकडून मिळवली. सगळे विधी पार पडले आणि गावजेवणही झाले. चार वर्षे उलटली. त्या पंगतीत जेवलेला एक गरीब ब्राह्मण घाशीरामच्या पुण्यात नातेवाइकाकडे गेला. सनातन्यांनी त्याला कैद केला आणि ४६२ रुपये दंड केला. या घटनेचा अर्थ मराठी आस्वादक समीक्षेत सापडणे कठीण आहे. विलास सारंगांनी 'डबक्यातील बेडकांचा डरांव डरांव' हे रूपक वापरून आपल्या 'कन्फेशन ऑफ मराठी रायटर' (वर्ड लिटरेचर टुडे) या लेखात या खुजेपणाचा खुलासा केला होता. प्रत्येक 'जातीतील डबलशी' त्याचा संबंध आहे.

थोडक्यात माझी तुलनाकार, उत्तरवसाहतवादी संस्कृतिस्ट (Culturalist) ही भूमिका ठाम आहे आणि विश्वसाहित्याच्या संदर्भातच मराठी साहित्यकृतीची मीमांसा व्हावी हा आग्रह आहे. आस्वादक समीक्षा, ग्रामीण, दलित, जनवादी इ. तुकडेबंदी व सुभेदारी म्हणजे नवजातवादी संधीसाधू, देशीवादी, स्वयंभू, कलावादी, रूपवादी वगैरे 'आळशी, ऐतखाऊ, ऐदी' शिक्षितांची बिनभांडवली उत्पादने आहेत. 'वालं', 'वदि', 'दभि' वगैरेंचे 'कुलकर्णी लीलामृत' समीक्षेत कसे व कोठून आले, याचे विवेचन करण्यासाठी दोन सिद्धांतांचा आधार घेऊ. संकल्पना व सिद्धांतांची फौज नसलेली भाषा अज्ञान भाषा बनत नामशेष होते. 'लोकसमूह, प्रदेश अथवा देश 'मुठीत' ठेवण्यासाठी संकल्पना व सिद्धांतांच्या आधारे अज्ञानाचे उत्पादन करावेच लागते किंवा तसे ते होतच असते, असे इमॅन्युअल कान्टने म्हटले होते. हे मर्ढेकरांच्या आयात लय तत्त्वांचा पगडा परवाच्या संमेलनातील अध्यक्षांच्यासह अनेक भाषणावर भरपूर टिकल्यावरून स्पष्ट होते. हे नीट समजायला डबक्यात साचलेल्या मागास साहित्यविचाराची तुलना जागतिकीकरणात विश्वसाहित्याचा इतिहास रचणाऱ्यांनी विकसित केलेल्या 'नात्यात्मक तुलना' (Relational Comparison), नात्यांची कमान (Arc of relations) अशी संकल्पना व नात्यात्मक सौंदर्यशास्त्राशी (Relational Poetics) केली पाहिजे. प्रतिसृष्टीचा निर्माता देव लेखकराव ही रोमँटिक कल्पना मराठीच्या डबक्यात आजही वर्चस्व गाजवते. उलट इलेक्ट्रॉनिक युगात तो रोमँटिक लेखक व त्याचा अभिप्रेत आदर्श वाचक या दोघांचेही निधन झाले आहे. लेखकाला डिजिटल वाङ्मय संस्कृतीत 'शब्द जुळारी' (Word Processor) म्हणतात. याचा नीट उलगडा न झालेल्या कोल्हापुरातील मुस्लिम लेखकाच्या एका वृत्तपत्रीय टिपणात एक समीक्षा घोटाळा मला आढळला. 'स्वामी', 'पानिपत' व 'ययाती' या कादंबऱ्या आजही लोकप्रिय का आहेत? या तिन्ही कादंबऱ्यांचे लेखक कोल्हापुरातील आहेत. इतिहास व पुराणाचे पुनर्लेखन असूनही त्या श्रेष्ठ का ठरल्या, हा प्रश्न त्याला पडला आहे. तथाकथित मराठी समीक्षा, त्यात कुरुंदकर, पाटणकर वगैरे सर्व पुरोहिती फौज आली, हे असे घडल्याची कहाणी सांगतात. आंतरराष्ट्रीय सांस्कृतिक व राजकीय संदर्भात ते का घडले याचा सैद्धांतिक

■

**माझी तुलनाकार, उत्तरवसाहतवादी संस्कृतिस्ट ही भूमिका ठाम आहे आणि विश्वसाहित्याच्या संदर्भातच मराठी साहित्यकृतीची मीमांसा व्हावी हा आग्रह आहे. आस्वादक समीक्षा, ग्रामीण, दलित, जनवादी इ. तुकडेबंदी व सुभेदारी म्हणजे नवजातवादी संधीसाधू, देशीवादी, स्वयंभू, कलावादी, रूपवादी वगैरे 'आळशी, ऐतखाऊ, ऐदी' शिक्षितांची बिनभांडवली उत्पादने आहेत.**

■



उलगडा करीत नाहीत. तुलना व रूपांतर, साहित्यातील 'फेकाफेकी' (रूथवेन, केंब्रिज प्रकाशन) यांचे प्रगत सिद्धांतन मराठीच्या बंदिस्त डबक्यात झाले नसल्याने असे दुय्यम दर्जाचे लेखन श्रेष्ठ म्हणून सांस्कृतिक वर्चस्व टिकवण्यासाठी अज्ञानातून अप्रत्यक्षपणे लादले जाते. शिवाजी महाराजांचा नाम जप राजकारणात मॅचफिक्सिंग करताना रोज करावा लागतो. पण शिवशाहीवर फक्त पाच आणि पेशवाईवर पाचशे पोवाडे का उपलब्ध आहेत, याची संस्कृती समीक्षा सापडणे अशक्य असते.

विश्वसाहित्य व समीक्षेची जाण नसल्यामुळे आस्वादक समीक्षेचा कॅन्सर जडल्याचे निदान मी टीकावस्त्रहरणमध्ये केले होते. सुलभीकरणाचा शाप बाधलेले समीक्षक, कलावंत वगैरे गडकऱ्यांचा पुतळा संभाजी ब्रिगेडवाल्यांनी तोडल्याचा निषेध करताना दिसले. एका कवीने त्यांच्या जोडीने 'नथुरामी' प्रवृत्तीचा धोकाही दाखवला. पण संमेलनात निषेधाचा ठराव मात्र ब्रिगेडवाल्यांचाच झाला. संजय आवटे यांनी प्रमोद महाजनांसारख्या केंद्रीय मंत्र्याचा खून भावाने केला पण एकही कथा-कादंबरी जन्मली नसल्याचे उदाहरण दिले. हे अमेरिकेत घडले असते तर डझनांनी कादंबऱ्या व चित्रपट झाले असते, असे ते म्हणाले. पण हे का घडले हे सांगण्याचे समीक्षा प्रभुत्व कुणाकडेच का आढळले नाही? ती क्षमता असलेली, सैद्धांतिक पाया असलेली समीक्षाच मराठीत नाही. ती नसण्याची कारणे शेवटी स्पष्ट करू. त्यासाठी जागतिक संदर्भातील 'साम्राज्याभ्यास' (Emporium Studies) विकसित होत आहे. पण गडकऱ्यांचे 'राजसंन्यास' ही वासाहतिक नाट्यसंकराची निर्मिती कशी आहे आणि संस्कृतकरणात इंग्रजीकरण मिसळत ब्राह्मणटॉक्सिफिकेशन वेस्टॉक्सिफिकेशनाचा संयोग कसा झाला, हे कुणालाही अजून कळलेले नाही. आवटेंच्या विधानावर एका मराठा पत्रकाराने हळूच पुस्ती जोडली होती. महाजनांच्या जागी मोहिते, पाटील, पवार आडनावांच्या केंद्रीय मंत्र्यांचा खून भावाने केला असता तर? 'सैराट मंत्री भैराट भानगडी', 'मोहित्यांचं लफडं', 'पवारांची बासरी' अशा कादंबऱ्या व चित्रपटासाठी एनआरआयच्या निधीचा पूर वाहिला असता की नाही, हे ह. मो. मराठ्यांना विचारावे लागेल. 'एक गाव बारा भानगडी' लिहिणारे लिंगायत शंकर पाटील जिवंत असते तरी महाजनांच्या खुनावर कधीच चित्रपटकथा लिहिली नसती. एवढे साहित्यिक व सांस्कृतिक मॅचफिक्सिंग त्यांच्या आंतरजातीय विवाहाने केले होते. ते कसे होते याची तुलनात्मक संस्कृतीमीमांसा प्रगत परिभाषेत नरेंद्र जाधवांच्या 'मी आणि माझा बाप'मधील जातभांडवलाच्या आधारे मी त्या ग्रंथावरील स्वतंत्र लेखात केली होती; पण 'जात'च वाङ्मयबाह्य ठरवून शतकानुशतके साहित्य समीक्षेबाहेर हद्दपार करण्याचे धूर्त राजकारण अज्ञानाच्या उत्पादनात चालत आले आहे. त्याला छेद देण्याची मागणी दिल्लीत साहित्य अकादमीच्या राष्ट्रीय चर्चासत्रात मी केली असता उठलेला गदारोळ आठवतो.

अशा सांस्कृतिक प्रदूषणात गडकऱ्यांच्या पुतळ्याचा विध्वंस ही सांस्कृतिक वसाहतवाद व साम्राज्यवादाची परिणती आहे, असे तुलनात्मक संस्कृती समीक्षेच्या परिभाषेत सिद्ध करण्याएवढी सामग्री व्हॉट्सअॅपवर नव्या पिढीतील संस्कृती अभ्यासकांनी व्हायरल केली आहे. 'राजसंन्यास'ची निर्मिती सूडबुद्धी, गडकऱ्यांच्या पूर्वजाला राजाने हत्तीच्या पायी देणे, संभाजी राजांना मुद्दाम व्यसनी व वासनांध चित्रित करणे असे अनेक आक्षेप घेतले गेले आहेत. लेखनस्वातंत्र्य, लेखकाची प्रतिभा वगैरे नेहमीचे सोंग ब्रिगेडवाल्या विरोधकांनीही सजवले आहे. खरा सांस्कृतिक निर्वासाहतीकरणाचा सैद्धांतिक मुद्दा आपल्या अज्ञानोत्पादक साहित्य संवर्धक विद्यमान संस्कृतीत आजवर कुणीच मांडलेला नाही. कारण ती तुलनात्मक संस्कृत मीमांसा कुणीच विकसित करण्याचे धाडस केलेले नाही. त्यासाठी ट्रकभर कच्चा माल उपलब्ध आहे आणि हे कचरा सफाईचे काम इंग्लंडप्रमाणे 'महाकाव्य, संस्कृती व गटर'सारखे अभ्यासक्रम नेमून निकोपपणे केले नाही तर अनर्थ ओढवेल. उदाहरणार्थ, जयवंत दळवींनी घेतलेल्या र. वा. दिघ्यांच्या मुलाखतीत रा. ग. गडकरींचे 'एकच प्याला' इटालियन नाटकाच्या इंग्रजी नाटकावर आधारित असल्याचा संदर्भ आला आहे. 'मराठी नाटकावरील पाश्चात्त्य प्रभाव १८१८-१९४७' या माझ्या इंग्रजी प्रबंधात या अनौरस नाट्यसंकराची सप्रमाण चर्चा केली आहे. परवा 'समग्र शेक्सपिअर : तुलनात्मक संस्कृती समीक्षा' या ग्रंथाची जुळणी करताना गडकरी पुतळा विध्वंसाचे मूळ विल्यम शेक्सपिअरच्या राजा चौथा हेन्री या नाटकाच्या ब्राह्मणीकरणाच्या 'तिळ्या' संस्कृतीकरणाच्या सिद्धांतात सापडले. विचाराने वैचारिक वाद लढवू पाहणाऱ्यांना माझे याविषयीचे आव्हान मी वीस वर्षांपूर्वीच दिले होते. शेक्सपिअरच्या राजकुमार, हालच्या आदर्श राजा बनण्याच्या अप्रतिम निकोप चित्रणाचे ब्राह्मणटॉक्सिफिकेशन नकळत झाल्याने हा मराठी सांस्कृतिक घोटाळा व संघर्ष उडाल्याचा निष्कर्ष निघतो.

मराठी समीक्षेची साफसफाई, धुलाई व पुनर्मांडणी आज विश्वसाहित्य व समीक्षेच्या संदर्भातच करणे भाग आहे. तुलना माहितीच्या स्फोटात अटळ आहेत. तसा आग्रह धरणारे व्यासंगी वासुदेवराव बळवंतराव पटवर्धन, शेजवलकर, स. गं. मालशे, रा. शं. वाळिंबे, श्री. म. माटे, यशवंतराव चव्हाण

यांसारखे सव्यसाची, वसाहतवाद व सनातनी आस्वादकविरोधी समीक्षक मराठी अभ्यासक्रमाच्या पोलादी चौकटीबाहेर ठेवलेले दिसतात. जगाच्या इतिहासाचे धागे जोडणाऱ्या तुलनाकारांत संजय सुब्रमण्यम आज आघाडीवर आहे; पण आंतरराष्ट्रीय साहित्याचे खरे भान दाखवणाऱ्या खऱ्या सत्त्वशील विलास सारंगाची उपेक्षाच झाली. उलट देशीवादाचे सोंग सजवणाऱ्यांसाठी ज्ञानपीठाकडील वाट मळण्यात सिंहाचा वाटा असणाऱ्या सयाजीराव गायकवाड महाराजांच्या लंडन विद्यापीठात मराठी-गुजरातीचे अध्यासन निर्माण करण्यासाठी संपूर्ण निधी देण्याचा दूरदर्शीपणा, विश्वसाहित्याचे भान दाखवणारे त्यांचे कोल्हापूरच्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनासाठी लिहिलेले भाषण व त्यावरील शास्त्रांचा सनातनी वहिष्कार आणि उत्तरवसाहतवादी साहित्याचा जाहीरनामा ठरावा असे यशवंतराव चव्हाणांचे कस्टम्स अ‍ॅण्ड सेलेब्रेशन्स' या ग्रंथात शोधले आहे. चालू शतकारंभी निकोलस डिर्क्सच्या 'द कास्ट ऑफ माईंड'सारख्या अनेक विद्वानांनी भारतीय जाती व वर्णव्यवस्थेत लिहिलेल्या ग्रंथात 'इंडिया इज कास्ट' या सूत्रावर भर दिलेला दिसतो. भारतीय साहित्याचे 'जातियीकरण' (Castealization) हे सूत्र शू-मेइ-शीच्या Racealization या संकल्पनेप्रमाणे भारतीय संस्कृती समीक्षेच्या केंद्रस्थानी आणले पाहिजे. आजचे भारतीय साहित्य नेमके कसे घडले, हे नीट उमगण्यासाठी संस्कृतीकरणाची वेदकाळापासूनची प्रक्रिया तिच्या नात्यात्मक सौंदर्यशास्त्र व नात्यांची कमान विश्वसाहित्याशी जोडत अभ्यासावी लागेल. 'लिव्ह लोकली, थिंक ग्लोबली' ऑर 'सिंक टोटली इन मराठी पॉण्ड?'

कोल्हापुरात पंचगंगेकाठी केलेल्या उत्खननात ग्रीक व

**"खरा सांस्कृतिक निर्वासाहतीकरणाचा सैद्धांतिक मुद्दा आपल्या अज्ञानोत्पादक साहित्य संवर्धक विद्यमान संस्कृतीत आजवर कुणीच मांडलेला नाही. कारण ती तुलनात्मक संस्कृत मीमांसा कुणीच विकसित करण्याचे धाडस केलेले नाही. त्यासाठी ट्रकभर कच्चा माल उपलब्ध आहे आणि हे कचरा सफाईचे काम इंग्लंडप्रमाणे 'महाकाव्य, संस्कृती व गटर'सारखे अभ्यासक्रम नेमून निकोपपणे केले नाही तर अनर्थ ओढवेल."**



आणीबाणीच्या काळातील कराडच्या साहित्य संमेलनाच्या (१९७६) स्वागताध्यक्षपदावरून केलेले भाषण या महत्त्वाच्या प्रवाहांची उपेक्षा नवजातवादी आस्वादक समीक्षेच्या छुप्या अजेंड्याने केल्यामुळे आजची मराठी समीक्षा मरणपंथाला लागली आहे, यात शंका नाही. तिचे रोगनिदान करण्यासाठी वीस मिनिटांच्या या भाषणात उपायांची यादी सादर करतो.

जगाच्या वाङ्मयाचा इतिहासच संदर्भासाठी वापरला पाहिजे. त्यातील अंतःसंबंधांशी मराठी साहित्य व समीक्षेशीही संबंध शोधण्याचे तुलनात्मक सौंदर्यशास्त्र मराठीत विकसित केले पाहिजे. क्षितिज समांतर सातत्य आणि रेखांशात्मक सातत्य यातील क्रिया-प्रतिक्रियांच्या तपासासाठी नवी परिभाषा घडवावी लागेल. संकल्पना, सिद्धांत, प्रतीके याचे आदान सतत जगभर होत असते. लॅटिन, हिब्रू, ग्रीक व संस्कृत या मुळात बोली होत्या. त्या साम्राज्य सत्तेच्या भाषा बनल्या. सत्ता टिकवण्यासाठी त्यांना वर्चस्व गाजवावे लागले. भारतात समृद्ध साहित्य परंपरा असूनही संकल्पना व सिद्धांतांचा दुष्काळ आहे. उलट दृष्टांत, कथा, पुराणे, लोककथा वगैरेंचा सुकाळ प्रचंड असल्याचे फ्रेंच पाद्री अ‍ॅबे दुबॉईसच्या निदर्शनास एकोणिसाव्या शतकाच्या सुरुवातीलाच आले. सुलभीकरणाच्या शापाचे हे मूळ त्याने आपल्या 'हिंदू मॅनर्स, रोमन वस्तू सापडल्या. मात्र रोमन व ग्रीक सैनिकांच्या बुटांशी कोल्हापुरी चपलेचे नाते जोडायचा प्रयत्न झाला नाही. आद्य भारतीय तुलनाकार डॉ. पंजाबराव देशमुखांचा The Origin and Development of Religion in Vedic Literature (Oup 1933) हा प्रबंध चाळला तरी वैदिक संस्कृतीकरणातील अनेक धागे विश्वसाहित्याशी नाते सांगताना दिसतात. ऋग्वेदात चंद्र, सूर्य व पृथ्वीच्या प्रेम त्रिकोणावरील ऋचा, ओल्ड इंग्लिशमधील व लॅटिन व ग्रीक तसेच नॉर्समधील काव्यपंक्ती यामधील साम्यभेद देशमुखांनी चांगले स्पष्ट केले आहेत. पण आजचा मराठीचा प्राध्यापक 'पृथ्वीचे प्रेमगीत' ही कुसुमाग्रजांची अलौकिक प्रतिभेची 'स्वयंभू निर्मिती म्हणूनच शिकवतो. हा एकारलेपणाचा शाप आस्वादक समीक्षा व मराठीत पाऊणशे वर्षे रेने वेलेक व ऑस्टिन वॅलेसचा 'थिअरी ऑफ लिटरेचर' ठाण मांडून बसल्यामुळे भोगावा लागत आहे. वेलेकला स्वतःचा साहित्याचा युक्तिवादी स्वयंभू जन्माचा सिद्धांत मातीत गाडायला लावून अमेरिकेतील तौलनिक साहित्याचा पहिला प्रोफेसर व्हायचा मान मिळाला. तसा आपला आस्वादक अफूच्या कुटिरोद्योगामध्ये माफिया झालेला समीक्षक बदलू शकतो का?

स्थितिप्रियतेची वैदिक संस्कृतीमधील संस्कृत व

संस्कृतीकरणाची प्रक्रिया देशमुखांच्या प्रबंधाच्या आधाराने खालील सूत्रात मांडू :

ग्रीक + लॅटिन + हिब्रू + पर्शियन + संस्कृत या प्राचीन संस्कृतीकरणाच्या (Acculturation) प्रक्रियेत मध्ययुगात ब्राह्मणीकरण + इस्लामीकरणाचे मिश्रण वाढले. समाजशास्त्रज्ञ एम. एन. श्रीनिवासने ब्रिटिशांच्या साम्राज्यात इंग्रजीकरण व संस्कृतकरणाच्या संयोगातून संस्कृतीकरणाची जुळी प्रक्रिया सुरू झाल्याचे म्हटले आहे. भारतीय आजपर्यंत त्यासाठी 'वेस्टर्नायझेशन' ही एकच संज्ञा जास्त प्रमाणात वापरतात. अर्थात, या 'पश्चिमीकरणात' बरेच घातक घटक आहेत. याची कल्पना म. गांधीजींना हिंद स्वराज्य (१९१९) लिहिताना होती, पण अरब सिद्धांतवाद्यांनी Westoxification ही संकल्पना धीटपणे स्पष्ट केली आहे. ती आजच्या 'संस्कृती संघर्षा'वर प्रखर प्रकाश टाकते. याचा अर्थ, प्रत्येक साहित्यकृती ही विशिष्ट संस्कृतीची निर्मिती असते. त्याचप्रमाणे ती सांस्कृतिक रणांगणच कायम असते. 'दुसऱ्यांदा रणांगण' हा अफू आस्वादनाच्या गुंगीतील फुकटच्या शब्दांच्या आधारे चाललेला श्रेष्ठत्वगंडीय संमोहनाचा प्रयोग असतो. याचा उलगडा संस्कृतीकरणाचे पुढील सूत्र भारतीय साहित्य व संस्कृती समीक्षेला लागू केल्यास चांगला होतो.

संस्कृतकरण - ब्राह्मणीकरण + उर्दूकरण→ मौलवीकरण - इंग्रजीकरण - पाश्चात्यीकरण - अमेरिकीकरण - ब्राह्मणटॉक्सिफिकेशन→ मौलविटॉक्सिफिकेशन - अँग्लीटॉक्सिफिकेशन + इंडियनायझेशन = संस्कृतीकरण.

अर्थात, 'भारतीयीकरण' ही संज्ञाच आता बोगस ठरली आहे. संस्कृत साहित्यापलीकडे, तेदेखील ब्राह्मणी, विदेशी विद्वानांना अन्य भाषा व साहित्याचा फारसा परिचय नसतो. वरील सूत्र लागू केले तर साहित्यातील बहुसंख्य अनौरस वाद ठार करावे लागतील आणि डझनभर प्रतिशेक्सपिअरना नाटकाच्या इतिहासातून हद्दपार करावे लागेल. 'फेकाफेकी'वाल्या 'भूषणां'ना दूषणे चिकटतील. कदाचित नवे शेक्सपिअरही पुढे येतील. उदाहरणार्थ, विजयनगरच्या साम्राज्याची स्थापना १३३६ साली झाल्यानंतर नाट्यकलेला चांगला राजाश्रय मिळाला. पंधराव्या शतकात कृष्णदेवराय यादव यांच्या 'जांभूळ आख्यान' या मराठी नाटकाचे प्रयोग नव्या भव्य नाट्यगृहात झाल्याचे उल्लेख आहेत. सामाजिक व राजकीय विषयावरील मराठी नाटकेही होत. राजा व प्रधानजीच्या उपस्थितीत स्त्रियांचे शोषण करणाऱ्या प्रधानजीवरील उपरोधी नाटक सादर झाले होते. गुजरातमधील राजाने त्या नाटक मंडळीला गुजराती भाषा शिकून ते खेळ करायला निमंत्रण दिल्याचे पुरावे आहेत. सोळाव्या शतकाच्या अखेरीस 'मेजर फॉर मेजर' लिहून प्रधानजीचे वस्त्रहरण करणाऱ्या शेक्सपिअरच्या आधी मराठी नाटककार अस्तित्वात होता. पण ही तुलनेची कमान जोडायची कशी? कारण सतराव्या शतकातील तंजावरच्या सरफोजी राजांना टाळून सांगलीच्या पटवर्धनांच्या दरबारातील भाव्यांच्या नाटकाचे बारसे १८८५ साली मुंबईत ब्रिटिश साहेबाच्या क्रेडलमध्ये साजरे झाले. समीक्षाच नव्हे तर मराठी साहित्याचा इतिहासही कालबाह्य टेलिफोन डिरेक्टरीच्या मोलाचा नाही.

थोडक्यात, संस्कृत परंपरेतील प्रमेये वापरून आधुनिक मराठी ग्रंथांची समीक्षा करण्याचे प्रयत्न फसले. पाश्चात्त्य परंपरेतील समीक्षेचे नमुने उचलाउचली करून स्वतःच्या नावावर खपवण्याचा मोठा सांस्कृतिक बाजार वधारला. मर्ढेकरांनी 'परपुष्ट'तेची मागणी चोऱ्या लपवण्यासाठी केली, पण खुलासा मात्र केला नव्हता. रा. भा. पाटणकर व इतरांनी रूपांतरे करून गोळाबेरीज मांडली, पण मराठीत जे सोईचे आणले त्या पेक्षा 'गैरसोई'चे कोणते सिद्धांत व संकल्पना का आणल्या नाहीत, याची उलटतपासणी करावी लागेल. उदा. प्रतिकारवादी सौंदर्यशास्त्र, सौंदर्यशास्त्राचे राजकारण, उत्तरवासाहतिक समीक्षा अशा अनेक विषयांवर एकही ग्रंथ नाही. उलट 'संस्कृती' शब्द शीर्षकात वापरून 'संस्कृती समीक्षा' या प्रगत क्षेत्रातील ग्रंथ असल्याचा आभास काही तद्दन थर्ड क्लास निबंध संग्रहात निर्माण केलेला दिसतो. तुलनात्मक अथवा तौलनिक हा भारदस्त पण पोकळ शब्द ग्रंथाच्या शीर्षकात वापरून अज्ञानाचे प्रदर्शन मांडल्याचे 'बालिश' प्रकार हास्यास्पदच नव्हे तर किळसवाणे आहेत. तौलनिक साहित्य व संस्कृती अभ्यासाच्या संयोगातून नवी समीक्षा पद्धती कशी आकारास येत आहे आणि मराठीच्या गावी नसलेले अनेक समीक्षाप्रकार विकास पावत आहेत. हे स्टीव्हन द टोटोसीने केंब्रिज विद्यापीठ प्रकाशनासाठी संपादित केलेला वर्ल्ड लिटरेचर, कम्पॅरेटिव्ह लिटरेचर अँण्ड कल्चर स्टडीज (२०११) पाहिल्यास लक्षात येईल. त्यातील दहा टक्के परिभाषा मराठीत रुजली असती तर मी मराठीत समीक्षा आहे, असे मान्य केले असते. ती मरावी ही श्रींची इच्छा आहे.

◆

(६ फेब्रुवारी २०१७, डोंबिवली येथील अ. भा. मराठी साहित्य संमेलनात केलेल्या भाषणाचे पुनर्लेखन)

**प्रा. डॉ. आनंद पाटील**
८९, गीतानंद,
अरुणोदय हौ.सो. शाहू पार्क,
कोल्हापूर- ४१६००४
चलभाष : ९४०४१४०९९५



अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

डॉ. रमेश अर्जुन शिंदे

# वेगळी कथासूत्रे आणि अनोखी आशयसूत्रे असणारा कथासंग्रह मृगतृष्णा

■■

**मृगतृष्णा या कथासंग्रहातील कथा या नायिकाप्रधान कथा आहेत. या नायिका समकाळासह भूतकाळातील विविध घटनाक्रमांमध्ये स्वतःचे अस्तित्व शोधणाऱ्या आहेत. त्या उच्चविद्याविभूषित, कमवत्या व स्वयंसिद्ध आहेत.तरीही त्या भारतीय पुरुषी परंपरेला शरण जाणाऱ्या आहेत. त्यांच्याकडे शिक्षण,पैसा,पद व स्वतंत्र विचारसरणी आहे. नवे काहीतरी करण्याची उमेद आहे. पण समाजव्यवस्थेतील पुरुषी मानसिकता त्यांना दुय्यम स्थान देते व तिची वैचारिक, मानसिक व शारीरिक कोंडी करते. त्यामुळे ती शेवटी व्यवस्थेला शरण जाण्याचाच पर्याय निवडते. हे तथाकथित आदर्शवत जगणे ती सर्वच पातळ्यांवर स्वीकारते.**

■■



मराठी साहित्यात लक्ष्मीकांत देशमुख हे नाव आता सर्वश्रुत झाले आहे. १९८० नंतरच्या कालखंडात आपल्या लेखनाचे वेगळेपण त्यांनी सिद्ध केले आहे. कथा, कादंबरी व नाटक या वेगवेगळ्या साहित्यप्रकारात त्यांनी विविधांगी लेखन केले आहे. संवेदनशील व्यक्तीमनाने सभोवतालच्या घटनांचा लावलेला अन्वयार्थ असे त्यांच्या लेखनाचे स्वरूप राहिले आहे. प्रशासकीय व्यवस्था, सामाजिक-सांस्कृतिक अस्वस्थता आणि कौटुंबिक नातेसंबंधाची ओढाताण हे विषय त्यांच्या लेखणीने नेमकेपणाने हाताळले आहेत. विविध सामाजिक समस्या शोधून त्याच्या मुळापर्यंत जाण्याचा त्यांच्या लेखनाचा हेतू राहिला आहे. त्या त्या व्यवस्थेतील घटकांचा धांडोळा घेताना अनुभवांचे कलात्मक चित्रण त्यांनी केले आहे. प्रशासकीय सेवेत असताना त्यांचा सर्व स्तरातील लोकांशी थेटपणे संपर्क आला आहे. गावगाड्यापासून ते मेट्रो सिटीपर्यंतची जनजीवनाची रीत त्यांनी अगदी जवळून अनुभवली आहे. त्यातील बारकावे त्यांच्यातील संवेदनशील मनाने अचूकपणे टिपले आहे. बदलत्या आणि गतिमान जगाबरोबरच भारतीय परंपरांचे भान त्यांच्या एकूण साहित्यातून व्यक्त झाले आहे.

लक्ष्मीकांत देशमुख यांचे आतापर्यंत सहा कथासंग्रह प्रकाशित झाले आहेत. विशिष्ट सूत्राधारे (थीमबेस्ड) या प्रत्येक कथासंग्रहाची लेखनमांडणी झाली आहे. दैनंदिन जगण्यातील पण अस्वस्थ करणारे विश्व त्यांनी या कथांमधून उभे केले आहे. त्यातून समकालीन समाजमनाची त्याचबरोबर परंपरेची नव्याने चिकित्साच केली आहे. आधुनिकीकरणाच्या रेट्यात मानवाची विविधांगी प्रगती झाली पण अनेक क्षेत्रात समस्यांचे, दुःखाचे असणारे वादळ आडपडदा नाही करता येत हे त्यांच्या कथांमधून व्यक्त झाले आहे. पर्यावरणाच्या विनाशातून आलेला पाणीप्रश्न असेल किंवा स्त्रीभ्रूणहत्येमुळे निर्माण झालेला मानवी असमतोल त्यांनी नेमकेपणाने आपल्या कथांमधून मांडला आहे. या समस्या जशा व्यक्ती, कुटुंबजीवनाला स्पर्श करतात त्याप्रमाणे समाजमनालाही धक्का देणाऱ्या आहेत.

'मृगतृष्णा' (२०१५) हा लक्ष्मीकांत देशमुख यांचा अलीकडे आलेला एक महत्त्वपूर्ण कथासंग्रह आहे. यात एकूण ११ कथा आहेत. या सर्व कथा स्त्री-पुरुष नातेसंबंधावर विविधांगी प्रकाश टाकणाऱ्या आहेत. या नात्यांची



अनुक्रमणिका



वर्तमानकाळात होणारी गुंतागुंत, त्यातून निर्माण झालेला संघर्ष या कथांमधून आला आहे. प्रेम, सहजीवन, आत्मसमर्पण, दुय्यमत्वासाठी केलेला संघर्ष, व्यभिचाराचे मानसिक व शारीरिक स्तरावर होणारे परिणाम यासह समलिंगी संबंधाचे काही खाजगी अनुभवही या कथांमधून आले आहेत. ललित साहित्य निर्मितीची एक प्रभावी व प्रबळ प्रेरणा, स्त्री-पुरुष संबंधाचे चित्रण आहे आणि ते भारतीयच नव्हे तर आजवर निर्माण झालेल्या जागतिक पातळीवरील साहित्यातूनही हेच अधोरेखित होते. त्याचे लेखक व वाचक प्रत्येक काळात असणारच, हे देशमुख प्रस्तावनेमध्ये स्पष्ट करतात. आदिकाळापासून फक्त जैविक माता-पिता एवढेच शाश्वत नाते असताना मानवाने नंतरच्या काळात विविध नाती निर्माण करून त्यातील गुंतागंत अधिक वाढविली. तरीही स्त्री-पुरुष नाते हाच त्याचा गाभा राहिला आहे. अशा स्त्री-पुरुष संबंधाच्या विविध छटा, शारीरिक व मानसिक कंगोरे या कथासंग्रहातून रेखाटले आहेत. याविषयी ते मनोगतामध्ये म्हणतात, स्त्री-पुरुष संबंध हा असा अथांग समुद्र आहे की, त्याचा तळ कितीही प्रयत्न केला तरी गवसत नाही. पाऱ्याप्रमाणे काहीतरी निसटून जातंच. म्हणून ललित साहित्यामध्ये यावर सतत लिहिलं जातं, जाणारच. त्याप्रमाणे या कथा अशा संबंधावर नव्याने प्रकाश टाकतात. फिल्मसिटीमध्ये काम करत असताना लिहिलेल्या या कथांमधून समकालीन विविध सामाजिक, जातीय व कौटुंबिक प्रश्नांची उकल शोधण्याचा प्रयत्न केला आहे. त्या त्या वातावरणात आलेले अस्वस्थ करणारे विविध अनुभव त्यांनी नेमकेपणाने मांडले आहेत. वेगळी कथासूत्रे आणि अनोखी आशयसूत्रे असणारा हा कथासंग्रह वाचकांना अंतर्मुख करतो.

मृगतृष्णा या कथासंग्रहातील कथा या नायिकाप्रधान कथा आहेत. या नायिका समकाळासह भूतकाळातील विविध घटनाक्रमांमध्ये स्वतःचे अस्तित्व शोधणाऱ्या आहेत. त्या उच्चविद्याविभूषित, कमवत्या व स्वयंसिद्ध आहेत. तरीही त्या भारतीय पुरुषी परंपरेला शरण जाणाऱ्या आहेत. त्यांच्याकडे शिक्षण,पैसा,पद व स्वतंत्र विचारसरणी आहे. नवे काहीतरी करण्याची उमेद आहे. पण समाजव्यवस्थेतील पुरुषी मानसिकता त्यांना दुय्यम स्थान देते व तिची वैचारिक, मानसिक व शारीरिक कोंडी करते. त्यामुळे ती शेवटी व्यवस्थेला शरण जाण्याचाच पर्याय निवडते. हे तथाकथित आदर्शवत जगणे ती सर्वच पातळ्यांवर स्वीकारते. नोकरी व्यवसायापासून ते शयनगृहातील संपूर्ण समर्पणापर्यंत तिची शरणागतता सतत मनाला अस्वस्थ करत जाते. निळे डोळे कथेतील बाबी फिल्मी दुनियेतील एक नामवंत-रूपवान नायिका, दिग्दर्शिका आहे. आपल्या पहिल्या प्रेमसंबंधाचा (शारीरिक आणि मानसिकही) विरह तिला आयुष्यभर सल बनूनच राहतो. एकाचवेळी ती आपल्यासमवेत तीन पिढ्यांशी जगत असते पण तिचा मानसिक कोंडमारा ती कोणापाशीच व्यक्त करू शकत नाही. त्यामुळे तिला डिप्रेशन येते व असंबद्ध वर्तन करू लागते. अशाच प्रकारचा कोंडमारा ब्रह्मास्त्र या ग्रामीण कथेतील सरपंच सईचा झालेला आढळतो. गलिच्छ राजकारणाचा व पुरुषी अहंकाराचा ती बळी ठरते. सुशिक्षित स्त्रीला समाजाचा, गावाचा व महिलांचा सर्वांगीण विकास करावयाचा असतो पण दुखावलेल्या पुरुषी (इगो) व्यवस्थेचा जबरदस्त आघात व्यक्तिगत जीवनात तिला सहन करावा लागतो. इच्छा असूनही या सर्वांमधून तिला अनपेक्षित माघार घ्यावी लागते. म्हणजे अशा या समर्थपणे धडपडणाऱ्या, स्वतःच्या पायावर उभ्या राहण्यास सक्षम असणाऱ्या या नायिका परिस्थितीशरण जातात.

एकविसाव्या शतकातही पुरुषी व्यवस्थेत स्त्रीला दिलेले दुय्यमत्व हे या कथासंग्रहाचे बीजसूत्र आहे. तिच्या कर्तृत्वाला, कर्तबगारीला न जुमानता तिला मागे ठेवण्याच्या या शोकांतिका आहेत. आज कायदा, घटना, आरक्षण यांच्या आधारावर स्त्रिया सर्व स्तरावर फक्त सहभागी झाल्या पण कार्यशील नाही होवू दिल्या. आपली राजकीय सामाजिक परंपरा तिच्या कर्तृत्वाविषयी शंका घेते किंवा तिची योग्यता तपासण्याचेही धाडस दाखवत नाही. ती कितीही उच्चविद्याविभूषित असली तरी तिच्या आधिपत्याखाली काम करण्यास पुरुषी मानसिकता धजत नाही. तशी वेळ आलीच तर तिचा पराभव किंवा तिला नामोहरम करण्यासाठी वेगवेगळ्या पातळ्यांवर- अगदी खालच्या स्तरावर जाऊन कटकारस्थाने केली जातात. अशा वेळी तिच्या घरातील मंडळीही आधार न देता तिच्यावरती अविश्वास दाखवितात. ब्रह्मास्त्र कथेतील सई राजकीय आरक्षणामुळे सरपंचाच्या खुर्चीवर बसते पण स्वतःच्या मर्जीने काम करण्यासाठी तिला स्पेस नाही मिळत. माजी सरपंच माणिक रोकडेच्या हातचलाखीतून ती सुरक्षित नाही

राहत. तिच्या नवऱ्याला दारू पाजून, तिच्यावर गलिच्छ आरोप करून तिचे कौटुंबिक व सार्वजनिक आयुष्य उद्ध्वस्त केले जाते. यातून तिला सावरताना सामाजिक कार्यकर्ती नीता म्हणते, स्त्रीला मुक्त व्हायचं असेल व पुरुषांच्या बरोबरीनं सार्वजनिक जीवनात स्वतंत्र स्थान निर्माण करायचं असेल तर प्रत्येक स्त्रीने लक्ष्मी, सरस्वती व दुर्गा व्हावं! सरस्वती म्हणजे साक्षर, सुशिक्षित व विचारी होणं; लक्ष्मी म्हणजे आर्थिकदृष्ट्या स्वावलंवी होणं आणि दुर्गा म्हणजे अन्यायाविरुद्ध कणखरपणे लढणं... या तीन गुणांशिवाय स्त्रीला पुरुषांची मानसिकता बदलता येणार नाही.(६८, मृगतृष्णा) पण स्त्रीच्या चारित्र्यहननाचा जेव्हा प्रयत्न होतो, तेव्हा ही सर्व रूपे धारण करता येत नाहीत. बदनामीच्या भीतीपोटी आपल्या विचारांना व विद्रोहाला मुरड घालावी लागते. याला अपवाद म्हणजे 'जात नाही, ती जात' या कथेतील शीतल ही नायिका आहे. धनगर-मराठा या जातसंघर्षात जेव्हा स्त्रीत्व हरणाची योजना आखली जाते, तेव्हा ती नायिका विद्रोह करून उठते. घरातल्यांचा विरोध असूनही धनगर जातीची शीतल मराठा जातीतील रमेशशी प्रेमविवाह करते पण याचा राग मनात धरून रमेशच्या घरचे बदला घेण्यासाठी विविध प्रयत्न करतात. त्यात शीतलच्या वडिलांच्या हातून रमेशच्या वडिलांचा खून होतो. यातून हे सूडसत्र शीतलच्या घरापर्यंत पोचते. आपला व बहिणीचा काही दोष नसताना केवळ जातीय सुडापोटी व खोट्या प्रतिष्ठेसाठी वापर केला, हे जेव्हा शीतलला समजते, तेव्हा ती नवऱ्याविरुद्धच उभी राहते. जातीय सूड घ्यायचा असेल तर खुनापेक्षाही स्त्रीत्वाचे हनन करण्यासाठी आपल्या अविवाहित बहिणीकडे निघालेल्या नवऱ्याविरुद्ध ती पोलिस केस करते व बहिणीला फोनवर सांगते- धीर धर. मी येतेय घरी आता. पोलिस माझ्याकडे येतायत. ते मला बाहेर काढतील. त्यांच्या जीपनं पोचतेय... अणि तुझ्या अब्रूच्या रक्षणासाठी गोळी घालायला मी मागेपुढे मुळीच पाहणार नाही... आप्पांसोबत मीही फासावर लटकेन... पण-पण तुला वाचवेन. एक स्त्री म्हणून एका स्त्रीला... (१६५, मृगतृष्णा) या कथेतील जातसंघर्षापेक्षाही स्त्री-पुरुष संघर्ष अधिक टोकदार होतो. केवळ आपल्या बहिणीला वाचविण्यासाठी नव्हे तर एका स्त्रीत्वाला जपण्यासाठी ती खंबीरपणे उभी राहते. ही ग्रामीण स्त्री आपल्या मातृसत्ताक समाजव्यवस्थेतील जितकी सोशिक तितकीच कणखरही वाटते. हे थांबवायचे असेल तर स्त्रीनेच खंबीरपणे पुढाकार घेणे व प्रतिकार करणे गरजेचे आहे. स्त्रीचे दुय्यमत्व जसे ग्रामीण भागात आहे तसेच किंबहुना त्यापेक्षा जास्त शहरी व उच्चशिक्षित समाजातही आहे.

स्त्री म्हणजे धरती आणि पुरुष म्हणजे बीज ही पारंपरिक धारणा आजही टिकून आहे. त्यातून स्त्री म्हणजे वंशाला दिवा देणारी वस्तू समजून तिच्याकडून तश्या अपेक्षाही सर्वचजण ठेवतात पण तिला काय वाटते, याचा विचार फारसा केला जात नाही. हेच सूत्र देशमुख यांच्या 'धरती आणि बीज' या कथेचे आहे. या कथेत एकाचवेळी दोन विषम समाजघटकातील कौटुंबिक परिस्थितीचे चित्रण केले आहे. आयएएस असणाऱ्या देवनाथला आपल्या उच्चविद्याविभूषित पत्नी- शिलाकडून मुलाची अपेक्षा असते. हीच अपेक्षा देवनाथ व शिलाच्या कुटुंबाकडूनही असते. त्यासाठी ते सर्वजण विविध उपचार करत असतात पण शेवटपर्यंत त्यात यश येत नाही. तेव्हा शिलाचा मानसिक कोंडमारा असह्य होतो त्यावेळी तिची सामाजिक चळवळीत काम करणारी मैत्रीण वर्षा तिला मूल दत्तक घेण्याचा व या यातनांमधून सुटका करून घेण्याचा सल्ला देते. पण वंशाचा दिवा या एकाच प्रश्नाभोवती तिची पदोपदी मानसिक कोंडी होत राहते. याचवेळी त्यांच्या घरात काम करणारा आदिवासी भागातील नोकर रावजी आपल्या बायकोला मूल होत नाही म्हणून दुसरी पत्नी करून आणतो, तेही पहिल्या पत्नीच्या सहमतीने; कारण पहिली पत्नी शारीरिकदृष्ट्या कमकुवत असल्यामुळे, तिची जमीन नापिक बंजर असल्यामुळे दुसरी पत्नी करावी ही सर्वांचीच धारणा असते. ते समाजमान्यही असते, पण याचा शिलाला भयंकर तिरस्कार वाटतो. यासाठी ती रावजीला कामावरून काढण्याचा विचारही करत असते पण आपल्या समाजात अशा विवाहाला मूल असण्याच्या एकाच कारणासाठी मान्यताही आहे. देवनाथसाठीही हाच पर्याय स्वीकारण्याचा विचार असताना वर्षा तिला मूल दत्तक घेण्याचा निर्णय घ्यायला लावते. तो शेवटी खूप आढेवेढे घेऊन मान्य होतो. त्यात शिलाची झालेली शारीरिक व मानसिक स्थिती अस्वस्थ करते.

मेरे सरदार या कथेमध्ये दोन भिन्न संस्कृतींचा व दोन वेगवेगळ्या धर्मांचा संघर्ष मांडला आहे. पंजाबी संस्कृतीच्या नायकाशी प्रेमविवाह करणारी शामल

सुखविंदरला पंजाब सोडून महाराष्ट्रात घेऊन येते पण त्याची त्याच्या गावाशी, धर्माशी व संस्कृतीशी असलेली आपुलकी पूर्णपणे सुटत नाही. त्याच्या या घुसमटीला ओळखून शामल काही वर्षांनी त्याच्या गावी जाण्यासाठी तयार होते पण इंदिरा गांधी यांच्या हत्येनंतर उसळलेल्या दंगलीमध्ये प्रवासात असतानाच सुखविंदरचा अंत होतो. या सर्वाला स्वतः जबाबदार असणाऱ्या शामलची ही करुण कहाणी आहे. मृगतृष्णा विवाहित स्त्री नवऱ्यापलीकडे जाऊन कोणत्याही परपुरुषाचा साधा मैत्रीदाखल सुद्धा विचार करू शकत नाही, ही मानसिकता व्यक्त करणारी कथा आहे. ती नोकरी करणारी, पैसे कमावणारी असली तरी तिच्या भावनांना व विचारविश्वाला कमालीच्या मर्यादा येतात. ती त्यातून बाहेर येण्याचा प्रयत्न कधी करत नाही किंवा तसे करणे हे तिला अप्रस्तुतच वाटते. एक निखळ मैत्री करणारा तो तिला प्रवासात भेटतो आणि ती स्वप्नवत आयुष्यात हरवत जाते. आपल्या मनात असणाऱ्या अनेक विचार, कल्पना व भावनांना मोकळी करून देते, पण यामध्ये ती एक मैत्रीचेच नाते शोधते. मैत्री, सहवास व शेअरिंगसाठी कोणीतरी असावे व आपले सुख-दुःख त्याजवळ व्यक्त करावे पण त्यातून अधिक गुंता वाढू नये म्हणून त्याच्यापासून फारकत घेणेच तिला योग्य वाटते.

समलिंगी संबंध हा अलीकडे जागतिक स्तरावरचा चर्चेचा विषय राहिला आहे. अगदी सुरुवातीच्या काळापासूनच या विषयाला समाजमान्यता तर नव्हतीच पण ती एक विकृती मानली जात असे. आजही या गोष्टीला विशेष स्थान नाही. जी काही होते ती माध्यमचर्चा किंवा सिनेस्टोरीच. याबाबत विविध देशात अलीकडे सकारात्मक कायदे करून समलिंगी संबंधांना मान्यता देण्यात येऊ लागली आहे. हे लोक धीटपणे पुढे येऊन आपल्या कृतीचे समर्थन करू लागले आहेत.त्यासाठी विविध संघटना स्थापन करून व्यापक जनाधार मिळविण्याचे प्रयत्न केले जाऊ लागले आहेत. मराठी साहित्यात अभावानेच दिसणाऱ्या या वेगळ्या विषयाला देशमुखांनी आपल्या काही कथांमधून समर्थपणे हाताळले आहे. समाजनिषिद्ध विषयाची सकारात्मकता मांडली आहे. अशा समलिंगी संबंधावर प्रकाश टाकणारी ऑल माय लव्ह,ऑल माय फॉल्ट्स ॲण्ड इनसिपीड पॅशन ही कथा उल्लेखनीय आहे. हाय प्रोफाईल समाजव्यवस्थेतील एक न्यारी दुनिया लेखकाने या कथेत रेखाटली आहे. समलिंगी शारीरिक संबंधाचे मानसिक कंगोरे या कथेत आले आहेत. पूजा व ज्यूथिका या दोघी सौंदर्यस्पर्धेतील स्पर्धक आहेत. ज्यूथिकाला पूजाविषयी नेहमीच आकर्षण राहिलेले असते. किंबहुना यासाठीच ती या स्पर्धेत पूजाला यश मिळावे म्हणून सर्वतोपरी प्रयत्न करत असते. रूपवान पूजाने ही सौंदर्यस्पर्धा जिंकावी व आपण पूजाला जिंकावे ही लालसा सतत तिच्या मनामध्ये असते. पण याचवेळी पूजाचे प्रेम एक संस्थानिक राजकुमार प्रिंसवर असते. हा प्रिन्स त्याच्या आलोक नावाच्या मित्राशी समलिंगी संबंध असणारा असतो. पण तो मनाने अतिशय हळवा असतो. आलोक व प्रिन्सच्या अशा संबंधाविषयी जेव्हा पूजाला कळते, तेव्हा ती अस्वस्थ होते व प्रिन्सला सुनावून येते. आपल्या अशा संबंधाची बाहेर वाच्यता होईल या भीतीने तो आत्महत्या करतो. त्यामुळे पूजा निराश होते. एकीकडे आपणावर प्रेम करणाऱ्या ज्यूथिकाला ती नाकारते तर दुसरीकडे ज्याच्यावर आपण मनापासून प्रेम केले तो प्रिन्स आपल्यामुळे या जगात नाही, या मनःस्थितीमध्ये ती पूर्णपणे उद्ध्वस्त होते. अशा काळात तिला मानसिक आधार देण्याचे काम ज्यूथिका करते. या काळात पूजा ही अशा समलिंगी लोकांविषयी काम करण्याचे ठरविते व नकळत ती ज्यूथिकाला आपलेसे करते. एकूणच अशा संबंधांविषयी समाजामध्ये नकारात्मक गोष्टी अधिक बोलल्या जातात पण त्या अवस्थेतून जाणाऱ्या व्यक्तींची मानसिक स्थिती फारशी कोणी विचारात घेत नाही. त्याबाबत आजही सर्वच स्तरांवरून लोकजागृतीची गरज आहे. ही मानसिक कोंडी देशमुखांनी या कथेत नेमकेपणाने टिपली आहे.

दुसऱ्या महायुध्दात जपानमध्ये अणुस्फोटामुळे प्रचंड नरसंहार झाला. हिरोशिमा व नागासाकी या शहरांवर त्याचे दूरगामी परिणाम झाले. पुढील अनेक पिढ्या कुरूप व विकृत जन्मास आल्या. याच विषयावर 'हिबाकुशा' या कथेतून वेगळा प्रकाश टाकण्यात आला आहे. अणुस्फोटानंतर अमेरिकेतील युद्धाच्यावेळी अणुबॉम्ब निर्माण करणारे अणुशास्त्रज्ञ डॉ. फर्मीची पुतणी जेनी चाळीस वर्षांनी जपानमध्ये रसायनशास्त्र या विषयात संशोधन करण्यासाठी आपल्या वयोवृद्ध अंकलच्या सल्ल्याने जाते. तेथील रेडिओ ॲक्टिव्हिटीचा अभ्यास करताना ती हादरून जाते. अमेरिकेत हिरो असणारे, अणुबॉम्ब निर्माण करणारे अंकल अणुशास्त्रज्ञ डॉ. फर्मी यांचा व अमेरिकेचा तिला तिरस्कार वाटायला लागतो.

त्यातच तिची भेट अणुविकृत तनाकाशी होते. तो अतिशय बुद्धिमान व साहित्यात रस असणारा असतो. तो जेनीला आपल्यासह जपानमधील विद्रुपीकरणाची भयावह कर्मकहाणी सांगतो. ज्याचा जेनीच्या संशोधनाला विशेष फायदा होतो. पण जेव्हा ती डॉ. फर्मीची ती पुतणी आहे हे कळते, तेव्हा मूळचा सत्प्रवृत्तीचा असणारा तनाका आतापर्यंत प्रेमळपणे वागत असतो, पण खरी गोष्ट लक्षात आल्यावर तो सूडबुद्धीने पेटून उठतो. लक्षावधी जपान्यांचे प्राण घेणाऱ्या अणुशास्त्रज्ञ डॉ. फर्मीचा बदला घेण्यासाठी त्यांचेच रक्त असणाऱ्या जेनीवर तो पाशवी बलात्कार करतो व प्रायश्चित्त म्हणून स्वतः आत्महत्या करतो. या घटनेने उद्ध्वस्त झालेली जेनी तनाकाचे अणुविकृत अपत्य जन्माला येऊ देते. तोच खरा डॉ. फर्मीवरचा सूड असतो.

भविष्य आणि मृत्यूचे रूपक वापरून प्रेमातील, सहसंबंधातील विविधता लेखकाने नेमकेपणाने रेखाटली आहे. या मानसिकतेचे विविध परिणाम वर्तमान जगण्यात कसे अस्वस्थ करतात व कौटुंबिक जीवन कसे निराश होत जाते, याचे प्रत्यंतर यातील दोन कथांमधून येते. ज्योतिषशास्त्राला मानणारा मोठा वर्ग आजही आपल्यात आढळतो. लोकसमजुतींमध्ये याला विशेष असे स्थान आहे. तळहाताच्या रेषा या कथेमध्ये उच्चभ्रू समाजव्यवस्थेतील अनिरुद्ध व किरण यांच्या दहा वर्षांतील सुखी आयुष्यात फलज्योतिषामुळे केलेल्या भाकिताने प्रचंड तणाव निर्माण होतो. एकमेकांवर जीवापाड प्रेम करणारे हे जोडपे एकमेकांविषयी संशयी बनते, याची ही कथा आहे. मल्टिनॅशनल कंपनीत इंजीनिअर असणाऱ्या अनिरुद्धला व मुक्तहस्त लेखिका असणाऱ्या किरणला एक ज्योतिषमहाराज एकमेकांचा अदलाबदल करून दिलेला भविष्यभाकिताचा लखोटा परस्पर देतो. दोघांनाही एकमेकांचे भविष्य कळलेले असते पण स्वतःचे माहिती नसते. प्रेमळ अनिरुद्धच्या हातून खून होणार व पतिव्रता किरण व्यभिचार करणार या भविष्यकथनामुळे दोघांच्याही मनात परस्परांविषयी तिरस्कार निर्माण होतो. वर्तनात बदल होतो व इतक्या सुंदर जीवनशैलीची वाताहत होते. किरणवरती प्रचंड बंधने येतात तर अनिरुद्ध व्यसनाधीन बनतो व एकमेकांवर सतत संशय घेवू लागतात. त्यामध्येच अनिरुद्ध बंधुसमान मित्र विश्वास याची आपल्या घरी राहण्याची सोय करतो. विश्वासवर त्याचा पूर्ण विश्वास असतो व त्याच्याबाबत संशय घेण्याचाही विचार त्याच्या

**समलिंगी संबंध हा अलीकडे जागतिक स्तरावरचा चर्चेचा विषय राहिला आहे. अगदी सुरुवातीच्या काळापासूनच या विषयाला समाजमान्यता तर नव्हतीच पण ती एक विकृती मानली जात असे. आजही या गोष्टीला विशेष स्थान नाही. जी काही होते ती माध्यमचर्चा किंवा सिनेस्टोरीच. याबाबत विविध देशात अलीकडे सकारात्मक कायदे करून समलिंगी संबंधांना मान्यता देण्यात येऊ लागली आहे... ...मराठी साहित्यात अभावानेच दिसणाऱ्या या वेगळ्या विषयाला देशमुखांनी आपल्या काही कथांमधून समर्थपणे हाताळले आहे. समाजनिषिद्ध विषयाची सकारात्मकता मांडली आहे. अशा समलिंगी संबंधावर प्रकाश टाकणारी ऑल माय लव्ह,ऑल माय फॉल्टस ॲण्ड इनसिपीड पॅशन ही कथा उल्लेखनीय आहे.**

मनात येत नाही, पण अनिरुद्धकडून निराश झालेली किरण एका मोहाच्या क्षणी बळी पडते. विश्वासच्या रूपात ती अनिरुद्धला पाहते व नकळत समर्पित होते. ती भविष्यवाणी खरी ठरते. पण पुढील भविष्यकथन विश्वासच्या सावधानतेमुळे घडत नाही. दोघांचा संसार पूर्ववत होतो पण यामध्ये अनिरुद्ध आणि किरण या दोघांची झालेली गोची अस्वस्थ करते. कृष्णार्पण वस्तू या कथेत जीवन-मरणातील अंतर स्पष्ट करताना पुरुषी अहंकाराचे व स्त्रीच्या समर्पणाचे वर्णन करणारी आहे. स्वतःचे आयुष्यमान कमी करून पत्नीला आपली उर्वरित अर्धे आयुष्य देणाऱ्या नचिकेतचा हा त्याग काही दिवसातच अहंकारात बदलतो. आपण केलेल्या या कृतीचा त्याला पश्चाताप होतो.अगोदर निस्सिम प्रेमाचे प्रतीक असणारी ही जोडी अचानक या फलज्योतिषाच्या अंदाजाने उद्ध्वस्त होते. पत्नी गार्गीला



अनुक्रमणिका



नचिकेतचे हे वर्तन असह्य होते. शेवटी ती आपले दोन वर्षं वगळता संपूर्ण आयुष्यमान नचिकेतसाठी त्याग करते व राहिलेल्या या दोन वर्षात सुखी-समाधानी व आनंदी राहण्याचा निश्चय करते. आपल्या त्यागाचा कोठेही वर्तनात व वर्तमानात परिणाम न होऊ देता जगण्याचे ठरवते.

मृगतृष्णा या कथासंग्रहाचे आणखी एक वेगळेपण म्हणजे या ग्रंथाचे मुखपृष्ठ हे होय. पुंडलिक वझे यांनी या अकरा कथांना अचूकपणे आपल्या मुखपृष्ठातून नेमकेपणाने साकार केले आहे. मुखपृष्ठावर स्त्रीची दिसणारी अस्पष्ट प्रतिकृती व पुरुषाची स्पष्ट प्रतिमा ही आपल्या परंपरेचे निदर्शक आहे. स्त्रीची प्रतिमा अदृश्य ठेवल्यामुळे तिची एकच एक प्रतिमा साकार न होता तिची अनेक रूपे त्यातून अधोरेखित होतात. तिच्या पावलांचे रेतीवर उमटणारे ठसे, दूरवर उंचवट्यावर उभ्या असणाऱ्या पुरुषावर तिची असणारी दृष्टी ही या समाजव्यवस्थेची उतरंड व्यक्त करते. शतकानुशतके आपण स्त्रीला गृहीत धरत आलो व पुरुषी चौकटीतच तिला बंदिस्त करत आलो याचे हे प्रतीक आहे. मुखपृष्ठावर या दोघांमधील सीमारेषा पांढऱ्या रंगाच्या शेडने दाखविली आहे. तीच फक्त ठळक दिसते, बाकीचा भोवताल अस्पष्टच राहतो. स्त्रीच्या पावलाचे ठसे ज्या भूमीमधून उमटले आहेत, ती भूमी काळवंडलेली आहे किंवा अंधकारमय आहे. तो तिचा भूतकाळ आहे आणि केलेला संघर्ष आहे. हा संघर्ष व्यक्तीसापेक्ष न राहता परिस्थितीसापेक्ष आहे आणि या ठशांना आकार नाही पण त्याचा एक आवाज आहे. तो या कथेतील प्रत्येक स्त्रीच्या भूतकाळाचा अवकाश व्यापून आहे. जो मानसिक व शारीरिक पातळीवरचा आहे. तोच या संपूर्ण कथासंग्रहाचा मुख्य घटक आहे. तो पुंडलिक वझे यांनी मुखपृष्ठात तंतोतंत सामावून घेतला आहे. यातील सर्वच कथा या फ्लॅशबॅक प्रकारातील असल्यामुळे वर्तमानात स्वतःचे स्थान निश्चित करताना भूतकाळातील ओरखडे सतत तिच्या सोबत आहेत त्या पावलांच्या ठश्यांप्रमाणे. ती एक सल म्हणून तिला सतावते आहे. आपल्या जडणघडणीच्या प्रत्येक टप्प्यावर तिचा झालेला भ्रमनिरास तिच्या मनःपटलावरून पुसला जात नाही. त्यातून तर ती कधी कोमात जाते तर कधी शस्त्र हातात घेते.

लक्ष्मीकांत देशमुख यांच्या या कथासंग्रहामध्ये नागर व ग्रामीण अशा दोन्ही व्यवस्थांमधील अनुभवविश्व मनोविश्लेषणाच्या पातळीवर व्यक्त झाले आहे. एका बाजूला नागर समूहातील सुखवस्तू जीवनमान असूनही मानसिक अस्वस्थता आहे. सर्व असूनही मनातील तृष्णा बेचैन करते आहे. वर्तमान जीवन नीरस करते आहे, तर दुसरीकडे ग्रामीण भागात धडपडणारी नवशिक्षित पिढीची उलघाल आहे. काहीतरी सकारात्मक आशावाद आहे, ज्याच्या आधारावर वर्तमानाची योग्य सुसंगती लावण्याची धडपड आहे. या कथासंग्रहामध्ये तृष्णेचा आदिबंध कथानकाच्या पृष्ठभागी सतत जाणवतो. मग ती तृष्णा शारीरिक ओढीची असो किंवा मानसिक शांतीची असो. उत्तम प्रशासकाबरोबरच एक उत्तम माणूस म्हणून त्यांनी सामाजिक प्रश्नांची केलेली चर्चा उल्लेखनीय आहे. प्रत्येक सूक्ष्म अनुभवाचा पैस विस्तारत असताना त्यांचे कथानक आपसूक घडत जाते. त्याची तीव्रता एका सामाजिक प्रश्नाला जाऊन भिडते. स्त्री-प्रश्नांची विविध रूपे साकारताना त्यांच्याविषयीची सहानुभूती वाढत जाते. त्यामुळे वाचक या नायिकांच्या मोहात पडतो. जरी तिचे वर्तन समाजसापेक्ष नसले तरी परिस्थितीसापेक्षतेमुळे तिची नकारात्मकता लक्षात येत नाही. ही समीपता देशमुखांनी आपल्या पात्रांमधून व कथानकांमधून उभी केली आहे. कथांचा आशय प्रस्तुत करणारी भाषाशैलीही उल्लेखनीय आहे. चरित्र चित्रण, डायरी, संवाद व पत्रलेखन यामधून कथानकांची गुंफण केली आहे. नागर भाषा, त्यामध्ये अलीकडे वापरले जाणारे विविध भाषिक शब्द - विशेषतः इंग्रजीचा वापर - यामुळे त्या वातावरणाचा अंदाज येतो. तर ग्रामीण वातावरणाचा फिल येण्यासाठी उपयोजिलेली बोली भाषा नैसर्गिक वाटते. वेगवेगळ्या आशयसूत्रांनी गुंफलेल्या स्त्री-पुरुष संबंधावरील या कथा वाचकाला विचार करायला लावतात. वाचकांना भावसंपन्न व विचारसंपन्न बनवितात.

◆

**डॉ. रमेश अर्जुन शिंदे**
कला व वाणिज्य महाविद्यालय, माढा.
ता.माढा, जि सोलापूर.
पिन.४१३२०९
ई-मेल : shinderamesh007@gmail.com



समीक्षा

डॉ. नीलिमा गुंडी

‘मराठी भाषा : संचित आणि नव्या दिशा’

# मराठीच्या विकासाचा सम्यक व सखोल शोध

**ग्रंथाची मांडणी पाच विभागांमध्ये केली आहे. त्याद्वारे भाषेच्या प्रश्नाकडे बघण्याचे वेगवेगळे दर्शनबिंदू समोर येतात. ‘भाषाविचार आणि मराठीचे संचित’, ‘मराठीचा विविध क्षेत्रांतील भाषाव्यवहार’, ‘मराठीपुढील आव्हाने आणि भावी दिशा’, ‘प्रादेशिक भाषांच्या विकासाचे प्रयत्न’ आणि ‘आमची मराठी : तरुण पिढीचे मनोगत’ ही पाच विभागांची उपशीर्षके वाचतानाच विषयाचा किती मोठा पैस ग्रंथात समाविष्ट केला आहे, याची कल्पना येते.**




पिंपरी येथे झालेल्या ८९व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या निमित्ताने स्मरणिकेऐवजी एका स्मरणग्रंथाचे प्रकाशन करण्यात आले होते. ज्येष्ठ पत्रकार विजय कुवळेकर यांनी संपादित केलेल्या या ग्रंथाचे नाव आहे - ‘मराठी भाषा : संचित आणि नव्या दिशा’. साहित्य संमेलनाच्या निमित्ताने मराठी भाषेच्या विकासवाटांचा सम्यक व सखोल शोध घ्यायचा यातील प्रयत्न स्पृहणीय तर आहेच, शिवाय औचित्यपूर्णही आहे.

या ग्रंथाची मांडणी पाच विभागांमध्ये केली आहे. त्याद्वारे भाषेच्या प्रश्नाकडे बघण्याचे वेगवेगळे दर्शनबिंदू समोर येतात. ‘भाषाविचार आणि मराठीचे संचित’, ‘मराठीचा विविध क्षेत्रांतील भाषाव्यवहार’, ‘मराठीपुढील आव्हाने आणि भावी दिशा’, ‘प्रादेशिक भाषांच्या विकासाचे प्रयत्न’ आणि ‘आमची मराठी : तरुण पिढीचे मनोगत’ ही पाच विभागांची उपशीर्षके वाचतानाच विषयाचा किती मोठा पैस ग्रंथात समाविष्ट केला आहे, याची कल्पना येते. प्रत्येक विभागाला अनुरूप पद्यपंक्तींची योजना, रविमुकुल यांचे कल्पक मुखपृष्ठ आणि सुयोग्य मांडणी यामुळे हा ग्रंथ प्रथमदर्शनीच प्रभाव पाडतो. मराठीच्या प्रश्नांबाबतच्या चर्चेला आणि प्रत्यक्ष समस्यानिवारणाच्या कृतीला गती मिळावी, या हेतूने डॉ. पी. डी. पाटील (संमेलनाचे स्वागताध्यक्ष) यांनी प्रस्तुत ग्रंथाची निर्मिती केली असून दर्जेदार निर्मितिमूल्ये असलेल्या या ग्रंथाची किंमत मात्र प्रतीकात्मक ठेवली आहे. ‘प्रास्ताविका’त श्री. विजय कुवळेकर यांनी ग्रंथनिर्मितीमागील व्यापक उद्दिष्ट आणि तात्त्विक भूमिका नेमक्या शब्दांत मांडली आहे. पहिले साहित्यसंमेलन हे ‘ग्रंथकार संमेलन’ होते, हे लक्षात घेता या स्मरणग्रंथाचे नाते पूर्वपरंपरेशी असल्याचे त्यांचे म्हणणे लक्षात घेण्याजोगे आहे. अवघ्या महिना-दीड महिन्याच्या कालावधीत ५१ लेख व मार्मिक पानपूरके समाविष्ट असलेला हा सुमारे ४५० पानांचा ग्रंथ तयार करण्याचे आव्हान श्री. विजय कुवळेकर यांच्या दांडग्या जनसंपर्कामुळे व अनेकांच्या उत्स्फूर्त सहकार्यामुळेच शक्य झालेले दिसते.

पहिल्या भागात समाविष्ट असलेल्या १३ लेखांमध्ये भाषेविषयीचा तात्त्विक विचार, सांस्कृतिक-ऐतिहासिक तसेच कलाव्यवहाराबाबतची भाषिक परंपरा अशा भाषासंचिताचा विचार केंद्रस्थानी ठेवून केलेले चिंतन वाचायला मिळते. डॉ. गणेश देवी यांचे ‘भाषांचे भवितव्य’ हा लेख पुस्तकाला भक्कम वैचारिक



अनुक्रमणिका






- 'मराठी भाषाः संचित आणि नव्या दिशा'
- संपादक - विजय कुवळेकर
- संपादन साहाय्य - डॉ. नीलिमा गुंडी, संतोष शेणई, विनायक पात्रुडकर, वैशाली चिटणीस
- प्रकाशक - डॉ. पी. डी. पाटील
- मुखपृष्ठ व मांडणी - रविमुकुल
- मूल्य - २५० रुपये, पृष्ठसंख्या - ४२७

पाया पुरवतो. त्यात दिलेला इशारा गंभीर स्वरूपाचा आहे, तो असा :- 'आपण सारे इतिहासाच्या एका अशा संक्रमणाच्या बिंदूवर उभे आहोत की, जेथे 'बोलली जाणारी' भाषा अस्तास जाऊन 'पाहिली जाणारी' भाषा अस्तित्वात येणार आहे.' यातील तंत्रज्ञानाच्या साहाय्याने आजवर झालेली भाषेची प्रगती रेखाटणारा डॉ. विजय भटकरांचा लेख, युरोपीय भाषांच्या तुलनेत आपली भाषिक स्थिती पारखणारा डॉ. प्रमोद तलगेरी यांचा लेख, कला आणि भाषा यांचे प्रतिमेच्या माध्यमातून नाते उलगडणारा रवि परांजपे यांचा लेख, भाषांतरातून मराठीला मिळालेल्या योगदानाचा आढावा घेणारा डॉ. सुनंदा विद्यासागर-महाजन यांचा लेख इत्यादी अनेक लेख वाचकांना विचारमंथन करण्यास चालना देणारे आहेत. डॉ. अरुण टिकेकर, भानू काळे आदींचे लेखही महत्त्वपूर्ण आहेत. त्यात परिस्थितीचे अचूक निदान केले आहे.

दुसऱ्या भागात प्रशासन, संज्ञापनव्यवहार, सर्वसामान्य दैनंदिन व्यवहार, माध्यमव्यवहार, तसेच शिक्षण, न्याय, विज्ञान इत्यादी जीवनक्षेत्रांतील तज्ज्ञांचे लेख समाविष्ट आहेत. डॉ. पंडित विद्यासागर यांनी विज्ञान हा विषय लोकजीवनाचा भाग होणे आवश्यक असल्याचे म्हटले आहे. अनिल शाळीग्राम यांचा 'भाषा, ई-पुस्तके आणि सामाजिक बदल' हा लेख इमोजी शब्दचिन्हांच्या वापराविषयीची केवळ माहिती न देता त्याविषयी नवी दृष्टी देणारा आहे. अतुल कहाते यांचा 'कार्यालयांमधली भाषा', शांताराम दातार यांचा विधी व न्यायव्यवहारासाठी मराठीच्या उपयोजनाबाबतची आव्हाने मांडणारा लेख, अनुराधा मोहनी यांचा शासन व्यवहारातील भाषेविषयीच्या आक्षेपांबाबत नेमकेपणे बाजू मांडणारा लेख, वृत्तपत्रांतील भाषेविषयी क्ष-किरण टाकणारा संतोष शेणई यांचा लेख, दृक्‌श्राव्य माध्यमातील भाषेविषयी सजगता निर्माण करणारा डॉ. केशव साठ्ये यांचा लेख हे सर्व लेख मराठीच्या विकासातले अडथळे लक्षात आणून देतात. डॉ. मनोहर जाधव, डॉ. द. ता. भोसले आदींचे लेखही भाषाविषयक वास्तवाचे भान आणून देतात आणि समस्येची कारणमीमांसाही करतात.

तिसऱ्या विभागातील लेख मराठीपुढील आव्हाने लक्षात आणून देतानाच नव्या दिशेचे संसूचनही करतात. डॉ. अरुण निगवेकर, डॉ.दीपक पवार, निरंजन घाटे, डॉ. क. कृ. क्षीरसागर, वीणा सानेकर, म. ना. गोगटे आदींच्या लेखांतून शिक्षणाचे माध्यम, पारिभाषिक कोश, लिपीसुलभता, भाषानियोजन आदी अनेक पैलूंवर प्रकाश पडला आहे. 'अमराठी माध्यमातील राजभाषेची दयनीय स्थिती' ते 'परभाषा-अध्यापन' असे विषयही यात अंतर्भूत असल्यामुळे मराठीचा विचार वेगवेगळ्या परिप्रेक्ष्यातून करण्याची संपादकांची भूमिका यशस्वी ठरली आहे. मराठी माध्यमातून शिक्षण देण्यावर यात विचारवंतांनी भर दिला आहेच.

इतर प्रादेशिक भाषांच्या विकासवाटांचा तुलनात्मक विचार मांडणारा तिसरा विभाग इतर विभागांच्या तुलनेने लहान- चारच लेखांचा- आहे. हिंदी, तेलुगु, कन्नड, बांगला अशा चार भाषांच्या विकासविषयक उपक्रमांना त्यात स्थान आहे. डॉ. दामोदर खडसे, डॉ. विद्या देवधर, उमा कुलकर्णी आणि विकास गिते या भाषातज्ज्ञांनी लिहिलेले हे लेख भारतीय भाषांच्या काही सामायिक प्रश्नांकडे अंगुलीनिर्देश करणारे आहेत. त्याच वेळी विपरीत वास्तवातही नवउपक्रमांद्वारे चिकाटीने काम करण्याची प्रेरणा देणारेही आहेत.

या ग्रंथाचे एक वैशिष्ट्य म्हणजे यात तरुण पिढीच्या मनोगतालाही स्थान दिले आहे. 'माझी फंक्शनल भाषा' (गणेश मतकरी), 'मेकिंग ऑफ भाषा' (श्रुती आवटे), 'भाषा कोसळते अंगावर' (वर्जेश सोलंकी), 'मी भाषेच्या बिया पेरत निघालोय!' (ऐश्वर्य पाटेकर), 'भाषिक स्वचंही

फ्रॅग्मेंटेशन होणं अपरिहार्य' (प्रणव सखदेव) ही त्या लेखांची शीर्षकेही खूप बोलकी आहेत. संक्रमणाच्या उंबरठ्यावर असलेली भाषा जागतिकीकरणानंतरच्या वास्तवात तरुणांनी आत्मसात करताना कशी कात टाकून आकार घेत आहे; याचे चित्रण त्यात येते. हे तरुण सर्जनशील लेखक असल्यामुळे त्यांचे 'नेटसेव्ही' असणेही त्यात प्रतिबिंबित झाले आहे.

प्रस्तुत ग्रंथात भाषाविषयक वास्तवाचे भान ठेवून विचार केला असल्यामुळे केवळ एकांगी युक्तिवाद झालेले नाहीत. त्यात 'भाषिक प्रदूषणां'चे धोकेही लक्षात घेतले आहेत, 'खिचडी भाषे'ची समृद्ध विविधता अनुभवण्याची मानसिकताही समजून घेतली आहे. त्याच वेळी 'मराठीच्या सांस्कृतिक बलस्थानांचाही वेध घेतला आहे. सोशल मीडियातील 'लोकस' एकीकडे आणि पारंपरिक 'वाचक' दुसरीकडे. या दोहोंच्या मनोभूमिका विचारात घेणारे लेख यात आहेत. त्यामुळे तंत्रज्ञानात व्हॉईस आणि व्हिडिओ मेसेजिंगची सोय झाल्यामुळे तथाकथित निरक्षर वर्गाचे शहाणपणही भाषेच्या प्रवाहात येऊ शकेल, हा विश्वासही त्यात व्यक्त झाला आहे.

गंभीरपणे लेखन करतानाही यात रोचक माहिती आणि मार्मिक नोंदींना स्थान दिलेले दिसते. त्यामुळे आपल्या प्रशासनिक परिभाषाकोशात (स्त्रीमुक्तीविचार जागा होण्यापूर्वीच!) महिला पदावर आल्या तरीही त्यांच्यासाठी 'सभापती', 'राष्ट्रपती' अशा संज्ञा १९६०-६१ मध्येच नमूद केल्या आहेत, हे वाचताना कौतुक वाटते (अनुराधा मोहनी). 'क्युमुलस क्लाऊड' या शब्दाला 'राशी मेघ' ही संज्ञा र. वा. दिघे यांच्या 'पाणकळा' कादंबरीतून घेतल्याची नोंददेखील लक्षवेधी ठरते (अ. पां. देशपांडे). अनिल शाळीग्राम यांनी भाषेच्या भवितव्याचा विचार करताना जॉर्ज ऑरवेलच्या '1984' या कादंबरीतील बिग ब्रदर आणि भाषेचे राजकारण यांचा घेतलेला वेध रंजक तितकाच उद्बोधकही ठरतो. यात भाषेच्या विकासासाठी स्पष्ट मार्गदर्शनही आढळते. उदा. 'संकल्पनाकोशांची रचना करताना आंतरविद्याशाखीय परिप्रेक्ष्य बाळगणे फार महत्त्वाचे आहे' (डॉ. स्मिता गांधी), 'मराठी भाषेसंदर्भात SWOT विश्लेषण करणे आवश्यक आहे'. (डॉ. प्रकाश परब), 'प्रत्येक विद्यापीठात भारतीय भाषाकेंद्र असावे'. (डॉ. केशव सखाराम देशमुख) अशा अनेक उपयुक्त सूचना यात आढळतात.

असा हा ग्रंथ अधिकाधिक प्रमाणात वेळीच वाचक व अभ्यासक यांच्यापर्यंत पोचणे गरजेचे आहे. भाषाविषयक धोरण ठरवताना या ग्रंथातील विचारधनातून मर्मदृष्टी घेण्याची गरज आहे. त्यामुळे या ग्रंथात जाहिरात, चित्रपट आदी क्षेत्रांच्या, तसेच गुजराती, तमीळ आदी भारतीय भाषांतील परिस्थितीचा विचार करणाऱ्या लेखांची भर घालून नवी आवृत्ती काढणे आवश्यक आहे. हा दुर्मीळ ठरलेला ग्रंथ नव्या आवृत्तीच्या रूपात लवकर उपलब्ध होण्याची गरज प्रकाशनि लक्षात आणून द्यावीशी वाटते. कारण संशोधन व निरीक्षण यांची जोड देऊन सिद्ध झालेले यातील व्यासंगपूर्ण लेखन दीर्घकाळ उपयुक्त ठरणारे आहे.

◆


**डॉ. नीलिमा गुंडी**
'अन्नपूर्णा', पहिला मजला,
१२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, गल्ली क्र. ५,
पुणे - ४११००२
स्थिरभाष : ०२०- २४४८६०१५
ई-मेल : nmgundi@gmail.com







अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

**हरी नरके**

**शे**तकरी संघटनेचे नेते शरद जोशी यांचे वडील पोस्टात नोकरीला होते. ते साताऱ्यात कार्यरत असताना शरद जोशींचा जन्म झाला. शरद जोशी कोल्हापूरला प्राध्यापक म्हणून नोकरी करीत होते. ते संस्कृतप्रेमी होते. एका मित्राने 'तू संस्कृत भाषेचे उच्च शिक्षण घेणार असशील' असे म्हटल्याने जोशी चिडले आणि कॉमर्सला गेले. मुंबईच्या ज्या सिडनॅम कॉलेजमधून आजचे जगातले सर्वांत महत्त्वाचे अर्थशास्त्रज्ञ असलेले जगदीश भगवती आणि इतर अनेकजण शिकले, तिथे जोशींनी उच्च शिक्षण घेतले.

मुळात उच्च दर्जाचा अर्थशास्त्रज्ञ असलेला हा माणूस आय.ए.एस. परीक्षा पास झाला. आज ज्याला यु.पी.एस.सी.ची परीक्षा म्हणतात, तिला त्या काळात आय.ए.एस.ची परीक्षा म्हणत असत. त्या परीक्षेत पास होऊनही थोडे कमी गुण मिळाल्याने त्यांना आयएएस केडर न मिळता इंडियन पोस्टल सर्व्हिसचे केडर मिळाले. त्यांचे वडील आयुष्यभर नोकरी करून निवृत्त होताना ज्या पदावर होते, तिथून शरद जोशींनी सेवेची सुरुवात केली.

या खात्यात उच्चपदी जाण्याची संधी असताना त्यांनी ही नोकरी सोडली आणि ते स्वित्झर्लंडला गेले. तिथे जागतिक टपाल सेवेत दहा वर्षे त्यांनी नोकरी केली. खूप सुखाची आणि भरपूर पगाराची असलेली तीही नोकरी सोडून आपल्या पत्नीच्या व मुलींच्या इच्छेविरुद्ध हा माणूस भारतात परत आला आणि शेती करू लागला.

'शेती तोट्यात का जाते?' या प्रश्नांचा पिच्छा पुरवताना त्यांनी शेतकरी चळवळ उभारली. स्वातंत्र्य चळवळीनंतरची सर्वाधिक लोक तुरुंगात गेल्याचा विक्रम करणारी ही चळवळ त्यांनी उभारली. नावारूपाला आणली. देशातला शेतीप्रश्न त्यांनी ऐरणीवर आणला. त्यांनी शेतकऱ्यांना आत्मसन्मान दिला. स्वाभिमान दिला. 'भीक नको, हवे घामाचे दाम' ही घोषणा त्यांनीच जन्माला घातली.

'इंडिया विरुद्ध भारत' अशी ठळक मांडणी करून, सदैव लाथाडल्या गेलेल्या शेतकऱ्याची वेदना त्यांनी 'इंडिया'च्या वेशीवर टांगली. लक्ष्मीमुक्तीच्या आंदोलनातून दोन लाख महिलांची नावं सात-बाराच्या




# मराठी साहित्याची श्रीमंती वाढवणारा मौलिक ग्रंथ : अंगारवाटा... शोध शरद जोशींचा

उताऱ्यावर लावली गेली.

'भारतातल्या बहुतेक प्रश्नांचे मूळ दारिद्र्यात आहे आणि या दारिद्र्याचे मूळ शेतकऱ्यांच्या शोषणात आहे, शेतीमालाला उत्पादनखर्चावर आधारित वाजवी दाम मिळाल्याशिवाय हे दारिद्र्य दूर होणार नाही,' हे त्यांनी शास्त्रशुद्ध पद्धतीने समजावून सांगितलं. त्यांनीच शेतीचं खरंखुरं अर्थशास्त्र मांडलं.

पंतप्रधान व्ही. पी. सिंग जोशींचे मित्र होते. जोशींनी राज्यसभेचं खासदार व्हावं अशी त्यांची इच्छा होती. जोशींनी मात्र त्या खासदारकीसाठी प्रकाश आंबेडकरांचं नाव सुचवलं. आंबेडकर खासदार झाले, पण त्यांनी मात्र आपलं नाव शरद जोशींनी सुचवलं होतं, असं कधीही सांगितलं नाही.

देशाचे पंतप्रधानपद मिळवण्याची पात्रता असलेला हा माणूस. त्यांच्या सभेला वक्ते म्हणून उपस्थित असलेले अटलजी, चरणसिंग, चंद्रशेखर, व्ही. पी. सिंग पुढे पंतप्रधान झाले. महाराष्ट्रातल्या ज्या चार माणसांमध्ये ही क्षमता असूनही ज्यांना ते पद मिळालं नाही, त्यातले सगळ्यात उपेक्षित शरद जोशी.

हा माणूस योद्धा होता. दणकट होता. त्यानं बावीस वेळा शेतकऱ्यांसाठी तुरुंगवास भोगला. तब्येतीकडे दुर्लक्ष करून एस.टी.च्या लाल डब्यातून प्रवास करीत दहा हजार सभा गाजवल्या. १६ पुस्तकं लिहिली. शेकडो कार्यकर्त्यांना नाव मिळवून दिलं. जोशींवर शेकडो केसेस दाखल झाल्या होत्या.

शरद जोशी अफाट प्रतिभेचे नेते होते. तुफान वक्ते होते. फटकळ, काहीसे उद्धट, महत्त्वाकांक्षी आणि कोरड्या स्वभावाचे होते. आपल्या नशिबी श्रेयहीनताच लिहिलेली आहे, याची पूर्वकल्पना असूनही हा माणूस लढत राहिला. कोट्यवधी रुपये कमवण्याची क्षमता अंगी असलेल्या या माणसानं अनेकदा खिसा खाली असल्यानं कार्यकर्ते, मित्र यांच्याकडून मिळालेल्या शेसव्वाशे रुपयांवर गुजराण केली. त्यांचे हे हलाखीचे दिवस वाचताना डोळे पाणावतात. पत्नीनं आत्महत्या केली. दोन्ही मुली परदेशात गेल्या; तिथेच स्थायिक झाल्या. एकटा पडलेला हा योद्धा आयुष्यभर शेतकऱ्यांसाठी एकाकी झुंजत राहिला. आपल्या नातेवाइकांनीसुद्धा 'एक वाया गेलेला मुलगा' म्हणून आपल्याला हिणवावं, याचं त्यांना फार वाईट वाटायचं.

मी त्यांना अनेकदा भेटलो. त्यातल्या दोन प्रदीर्घ भेटी तर कायमच लक्षात राहिल्या. चाकणला रोटरी क्लबतर्फे माझं महात्मा फुल्यांवर भाषण होतं. त्यावेळेला जोशी राष्ट्रीय पातळीवरचे नेते असूनही श्रोत्यांमध्ये येऊन बसले होते. ते श्रोत्यांमध्ये असलेलं बघून भाषण करताना मला खूप टेन्शन आलं होतं. भाषण संपल्यावर ते स्टेजवर आले. त्यांनी पाठीवर थाप मारून मला दाद दिली. ध्रुवशेट कानपिळे यांच्याकडे बसून त्यांनी तासभर गप्पा मारल्या. आम्ही एकत्र जेवण केलं.

दुसरा प्रसंग एस. एम. जोशी वारले तेव्हाचा. त्यांच्या अंत्ययात्रेला जोशी आले होते. तिथे गोविंद तळवलकरही आलेले होते. दोघांमधून विस्तवही जात नव्हता.



**शरद जोशी हा अफाट माणूस समजावून घ्यायचा असेल तर हे पुस्तक वाचायलाच हवं. विशेष म्हणजे ही जोशींची केवळ विभूतीपूजा नसून अतिशय साक्षेपानं चरित्रनायकाच्या गुणदोषांचा धांडोळा घेणारा हा ग्रंथ आहे. अनेक घटना वाचकांपुढे प्रथमच आणणारा हा ग्रंथ म्हणजे चाकण ते स्वित्झर्लंडपर्यंत शेकडो जणांना भेटून केलेले एका देदीप्यमान कालखंडाचे अपूर्व दस्तऐवजीकरण होय. अतिशय वाचनिय, प्रभावी आणि मौलिक असा हा ग्रंथ लिहून भानू काळे या व्यासंगी लेखकानं भारतीय भाषांमधला गेल्या दोन दशकातला सगळ्यात महत्त्वाचा ग्रंथ आपल्याला दिला आहे.**











अनुक्रमणिका



- अंगारवाटा... शोध शरद जोशींचा,
- लेखक भानू काळे,
- ऊर्मी प्रकाशन, पुणे,
- पृष्ठे ५१० + २४ आर्टप्लेट्स,
- किंमत ५०० रुपये.
- संपर्क : प्रा. सुरेशचंद्र म्हात्रे, ९८२२३ ००३४८,

गोविंदरावांनी म.टा.मधून कायम जोशींची सालटं काढली होती. त्या अंत्ययात्रेत साने गुरुजी स्मारक, सारसबाग, टिळकरोड ते निवारा असा सुमारे तासाभराचा पायी प्रवास करताना माझ्या खांद्यावर हात टाकून जोशी मला असंख्य गोष्टी सांगत होते.

जोशींचं आयुष्य हे चमत्कार वाटावा असं मौलिक आणि गूढ.

त्यांच्या कार्याचे, स्वभावाचे, योगदानाचे अतिशय साक्षेपी चित्रण करणारा ग्रंथ प्रसिद्ध लेखक, संपादक श्री. भानू काळे यांनी लिहिला आहे. ५३४ पृष्ठांचा हा अतिशय मौलिक ग्रंथ आहे. तो पुण्याच्या ऊर्मी प्रकाशनानं अवघ्या ५०० रुपयांना दिलेला आहे.

मराठीमध्ये गेल्या अनेक वर्षांत असा महाग्रंथ लिहिला गेला नव्हता. या चरित्रग्रंथासाठी काळे यांनी आपल्या आयुष्यातील पाचहून जास्त वर्षे अभ्यासात घालवली. साधनं जमवण्यासाठी, जोशींच्या सहकारी, मित्र, कार्यकर्त्यांना भेटण्यासाठी काळे देशविदेशात गेले. शेकडो ग्रंथ, हजारो लेख आणि अक्षरशः लाखो दस्तऐवज धुंडाळले.

हे पुस्तक एकदा हातात घेतलं, की वाचून पूर्ण होईपर्यंत खाली ठेवता येत नाही. शरद जोशी हा अफाट माणूस समजावून घ्यायचा असेल तर हे पुस्तक वाचायलाच हवं. विशेष म्हणजे ही जोशींची केवळ विभूतीपूजा नसून अतिशय साक्षेपानं चरित्रनायकाच्या गुणदोषांचा धांडोळा घेणारा हा ग्रंथ आहे. अनेक घटना वाचकांपुढे प्रथमच आणणारा हा ग्रंथ म्हणजे चाकण ते स्वित्झर्लंडपर्यंत शेकडो जणांना भेटून केलेले एका देदीप्यमान कालखंडाचे अपूर्व दस्तऐवजीकरण होय. अतिशय वाचनिय, प्रभावी आणि मौलिक असा हा ग्रंथ लिहून भानू काळे या व्यासंगी लेखकानं भारतीय भाषांमधला गेल्या दोन दशकातला सगळ्यात महत्त्वाचा ग्रंथ आपल्याला दिला आहे.

शिक्षणयात्रा, व्यावसायिक जगात, डोंगरकुशीतल्या नंदनवनात, मातीत पाय रोवताना, उसाचे रणकंदन, धुमसता तंबाखू, पांढरे सोने-लाल कापूस, शेतकरी संघटना : तत्त्वज्ञान आणि उभारणी, अटकेपार, किसानांच्या बाया आम्ही, राजकारणाच्या पटावर, राष्ट्रीय मंचावर जाताना, सहकारी आणि टीकाकार, अंगाराकडून ज्योतीकडे : शोध नव्या दिशांचा, साहित्य आणि विचार, सांजपर्व अशी एकूण १७ प्रकरणं आणि ५ परिशिष्टं असलेला हा ग्रंथ आहे.

हे पुस्तक वाचून खूप अस्वस्थता आली. असा नेता आणि असा चरित्रग्रंथ हे मानवतेची श्रीमंती वाढवतात. आजच्या समकालीन जगण्याला ऐतिहासिक मोल प्राप्त करून देणारा हा योद्धा पुरुष कायम मध्यमवर्गीयांच्या हेटाळणीचा विषय राहिलाय.

'आजपर्यंतच्या इतिहासाची खरी प्रेरणा ही शेतीमध्ये होणारा गुणाकार लुटण्याची आहे' असं रोखठोक सत्य सांगणाऱ्या शरद जोशींची आपण कायम उपेक्षा केली. आता या ग्रंथाचीही उपेक्षाच करणार का?

◆

**हरी नरके**
स्थिरभाष : (०२०) २५४४ ३८३९
ई-मेल : harinarkegmail.com

## निवेदन

'महाराष्ट्र साहित्य पत्रिके'मधील मुख्य शाखा आणि जिल्हा शाखांचे कार्यवृत्त संबंधितांनी मार्च, जून, सप्टेंबर आणि डिसेंबर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यालयात पाठवावेत अथवा इ-मेल करावेत. कार्यवृत्त टाईप करून अथवा सुवाच्च अक्षरात लिहून पाठवावेत. कृपया वर्तमानपत्रांची कात्रणे पाठवू नयेत. तसेच कार्यवृत्ताचा मजकूर थोडक्यात असेल याची काळजी घ्यावी.

– प्रकाशक














पुस्तक परीक्षण

डॉ. वंदना बोकील-कुलकर्णी

# शोध अस्वस्थ कल्लोळाचा

**माणसांची पारख असणारे, त्याची ओळख नीट जपणारे, प्रचंड उत्साही, कोट्या-विनोद करणारे, खळखळून हसणारे, नेत्याला अपवादभूत अशा जीन्स-टीशर्टमध्ये वावरणारे भारदस्त व्यक्तिमत्त्वाचे जोशी लेखिकेने उभे केले आहेत. सॉमरसेट मॉमच्या कथांचा आधार घेत आपला मुद्दा स्पष्ट करणारे, स्पष्ट आणि तर्कशुद्ध विचार करणारे, प्रचंड वाचन करणारे, अभ्यासू जोशी तिनं अनुभवले आहेत. ते तसेच वाचकांना सादर केले आहेत.**



एक अभ्यासू, जिज्ञासू आणि संवेदनशील व्यक्तिमत्त्वाची १७-१८ वर्षांची युवती शरद जोशी या 'अस्वस्थ कल्लोळाच्या' संपर्कात येते किंवा थोरल्या भावाकडून बुद्ध्याच आणली जाते - असं म्हणू या. नंतर हे संपर्कक्षेत्र एका बाजूनं रुंदावत जातं आणि दुसऱ्या बाजूनं जवळही येत जातं. नंतरची १६-१७ वर्ष तिला शरद जोशींचा कमी-अधिक कालावधीचा सहवास घडतो. तिच्या स्वतःच्या वाढीच्या प्रवासात शरद जोशींशी तिचा संवाद होतो- सातत्यानं. विविध विषयांवर. त्यामधून तिला दिसलेले, अनुभवाला आलेले शरद जोशी आपल्याला 'शरद जोशी : शोध अस्वस्थ कल्लोळाचा!' या पुस्तकात भेटतात. खरंच भेटतात- ही आवर्जून नोंदवावी अशी जमेची बाजू!

वसुंधरा काशीकर-भागवत यांच्या या पुस्तकातून शरद जोशी या लोकोत्तर व्यक्तिमत्त्वाची जनसामान्यांना अपरिचित अशी बाजू समोर येते. पुस्तकाच्या मनोगतात लेखिका म्हणते, की शरद जोशींबद्दल का लिहायला पाहिजे, या प्रश्नाचं उत्तर मी मला मागितलं. माणसातली दुर्मीळ प्रजाती असावी, असं हे व्यक्तिमत्त्व, त्यांचं वेगळेपण लोकांपुढे यायला हवं, यासाठी हा लेखनप्रपंच तिनं मांडला. शेतकरी संघटक, आंदोलक, नेता, अर्थशास्त्रज्ञ ही जोशींची ओळख जगाला आहेच, पण यापेक्षा लेखिकेला झालेली त्यांची ओळख आश्चर्य वाटावं, इतकी वेगळी आहे. अविश्वसनीय वाटावी, इतकी अनोखी आहे. लेखिकेनं त्याविषयी लिहिलंय, त्यामुळे त्यांच्या अनेक अज्ञात पैलूंचा शोध घेण्याचा प्रांजल प्रयत्न या लेखनातून जाणवतो.

जगावं कसं, याचं 'रोल मॉडेल' वाटावं असं व्यक्तिमत्त्व अगदी जवळ असताना, काही प्रश्न पडले तर त्यांच्याकडे धाव घ्यावी असा हक्क असताना, चर्चा करावी असा व्यासंगी माणूस जिव्हाळ्याचा असताना आणि घरच्या-नात्यातल्या वडिलकीचं प्रेम असतानाही हे पुस्तक केवळ गुणवर्णनपर राहत नाही, याचं कारण लेखिकेची चिकित्सक दृष्टी!

युनोतली लठ्ठ पगाराची आणि प्रतिष्ठेची नोकरी, स्वित्झर्लंडसारख्या, पृथ्वीवरच्या स्वर्गीचं वास्तव्य वगैरे सोडून शरद जोशी भारतात आले, हे सर्वांना ठाऊक असतं. ठाऊक नसते ती त्यांची त्यामागची तळमळ, विचार, त्यासाठी उपसलेले अपरिमित कष्ट, केलेला त्याग आणि सहन केलेली उपेक्षा. त्यांचं शेतकरी संघटनेचं काम, त्यांची आंदोलनं, त्यांचं यशापयश यांचीही चिकित्सा केली जाते, पण त्यापलीकडे उरलेला 'हिमनग' मात्र अज्ञात पाण्याखालीच राहतो. अशा शरद जोशींची ओळख हे पुस्तक करून देतं.





शरद जोशी अखंड शोध घेत होते. अनेक प्रश्न त्यांना पडत. व्यवस्थेबद्दल पडतच, पण मानवी जगण्याविषयी पडत. आत्मशोधासंबंधी, जीवन-मृत्यूविषयी पडत. माणसांविषयीच्या आस्थेतून त्यांना अखंड अस्वस्थता असे. एक प्रकारची उदात्त अस्वस्थता! त्यामधून प्रश्नांचा, समस्यांचा आणि त्यावरच्या उपायांचा-निरुपायांचा अखंड कल्लोळ त्यांच्या मनी असे, हा लेखिकेचा अनुभव. या कल्लोळांचा शोध घेताना तिने समर्पक व काव्यात्म शीर्षकांच्या, आठ-नऊ पृष्ठांच्या १८ लेखांकांमधून या पुस्तकाची रचना केली आहे. 'उगवतीचे ऊन आता', 'तबीयत अपनी घबराती है', 'दुनिया की नसीहत पर', 'ते स्वातंत्र्य खरे न', 'गेले द्यायचे राहून' इत्यादी शीर्षके सहजच लेखांकाचा आशय सुचवून जातात. शिवाय शरद जोशींचे दुर्मीळ फोटो, त्यांचा जीवनपट, त्यांची ग्रंथसंपदा या माहितीची जोड पुस्तकाला दिली आहे.

जोशींची अर्थशास्त्रीय मांडणी, मुक्त अर्थव्यवस्थेची संकल्पना, आंदोलनासंबंधीची भूमिका इत्यादींबरोबरच या लेखनातून शरद जोशींची व लेखिकेची पहिली भेट, त्या भेटीचा तिच्यावर झालेला संस्कार, त्यांची साहित्याची जाण आणि अभिजात रसिकता, त्यांचं भाषाप्रभुत्व आणि भाषाप्रेम, स्त्रीपुरुष नात्यासंबंधीचे त्यांचे विचार यांचाही परिचय घडत जातो.

'दुनिया की नसीहत पर भी' या लेखात शरद जोशींचा तर्कबुद्धी ते भक्ती... हा प्रवास आणि त्याची असफलता समजून घेण्याचा प्रयत्न दिसतो. मनाचा कमकुवतपणा प्रामाणिकपणे कबूल करणारे जोशी इथे दिसतात. अंतिम सत्य काय आहे, हे जाणण्यासाठी व्याकूळ झालेले, त्यासाठी ज्ञानेश्वरीवाचन, उपासना, गुरुमंत्र, शेंडी आणि संध्यादेखील... अशा आचारधर्माकडे वळलेले जोशी भेटतात.

माणसांची पारख असणारे, त्याची ओळख नीट जपणारे, प्रचंड उत्साही, कोट्या-विनोद करणारे, खळखळून हसणारे, नेत्याला अपवादभूत अशा जीन्स-टीशर्टमध्ये वावरणारे भारदस्त व्यक्तिमत्त्वाचे जोशी लेखिकेने उभे केले आहेत. सॉमरसेट मॉमच्या कथांचा आधार घेत आपला मुद्दा स्पष्ट करणारे, स्पष्ट आणि तर्कशुद्ध विचार करणारे, प्रचंड वाचन करणारे, अभ्यासू जोशी तिनं अनुभवले आहेत. ते तसेच वाचकांना सादर केले आहेत.

'अंगारमळा', 'जग बदलणारी पुस्तके' या जोशींच्या लेखनाची विशेष दखल घेत तिनं या लेखकाची रसिकता, त्याचे काळाच्या पुढचे विचार, त्याची संवेदनशीलता हे पैलू उलगडून दाखवले आहेत. स्वातंत्र्य हे सर्वाधिक महत्त्वाचे मूल्य मानणाऱ्या जोशींच्या 'सुख-शांती आणि समृद्धी ही अधमांची उद्दिष्टे आहेत' अशा धक्कादायक विधानांचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला आहे.

लीलाताईंच्या मृत्यूनंतर जोशींना जाणवणाऱ्या अपार एकटेपणाविषयी लेखिकेनं समजुतीनं लिहिलं आहे आणि म्हणून समृद्ध करणाऱ्या संवादाची त्यांची भूकही जाणून घेतली आहे.

जोशी निवडणुकीला उभे राहिले, पण त्यांच्या ब्राह्मण जातीचे जे राजकारण करण्यात आले, त्याविषयीचा विषाद आणि निषेध लेखिकेने प्रकट केला आहे.

अनेकविध विषयांवर ती जोशींशी बोलली आहे- असं म्हणण्यापेक्षा जोशी तिच्याशी बोलले आहेत. त्यांच्याशी झालेल्या संवादांची समृद्धी वाचकांपर्यंत पोचवताना तिनं जोशींचे विचार, संभाषणाचे काही तुकडे जसेच्या तसे पुढे ठेवले आहेत. त्यामुळे पुस्तकाची मौलिकता वाढली आहे. अन्यथा जोशींच्या सहवासाच्या स्मृती- असं भावुक रूप त्याला आलं असतं. शिवाय तिनं तिची मतं, काही ठिकाणी असणारी विरोधी मतंही न संकोचता प्रकट केली आहेत. जोशींच्या मतांमधली, आचार-विचारांतली विसंगतीही टिपली आहे. उदा. त्यांची आवड अभिजात असूनही ते 'मी रुक्ष आहे', असं का म्हणत आणि तसं का प्रोजेक्ट करत, याचा तिला अचंबा वाटतो. विचारांती तिला वाटते, की जगण्यासाठी आणि आंदोलनासाठी लागणारी कठोरता आपण गमावून बसू की काय- असं त्यांना वाटत असावं.

नात्यामधल्या समर्पणशील, सात्त्विक, पारंपरिक स्त्रियांविषयी त्यांना आदर वाटे, पण समर्पण हे काही फार



- **शरद जोशी :**
  **शोध अस्वस्थ कल्लोळाचा!**
- **वसुंधरा काशीकर-भागवत**
- **राजहंस प्रकाशन, पुणे**
- **पृष्ठसंख्या : १५३**
- **किंमत : २००/- रुपये**









"शतकातून एखादाच होणारा हा माणूस आहे, याची जाण लेखिकेला नवतरुण वयातही होती. तरी त्यांनी बोलावलं म्हणून भर उन्हात बडनेरा स्टेशनवर त्यांना भेटायला गेल्यावर त्यांनी केलेलं दुर्लक्ष तिला बोचतं. आणि ही बोच ती व्यक्त करते. त्यांचं गुरुमंत्र घेणं, त्यांचा अहंकार यांविषयीही ती परखड मतं नोंदवते, त्यामुळे हे पुस्तक एकेरी राहत नाही वा चरित्रात्मकही होत नाही."

चांगलं मूल्य नाही, असं ते म्हणत असत. न आवडलेल्या गोष्टीला अगदी तुच्छ लेखण्याचा त्यांचा स्वभाव होता. अहंकार वाटावा असा जबरदस्त आत्मविश्वास त्यांच्यापाशी होता, हेही लेखिका न लपवता सांगते.

स्वतःच्या प्रकृतीचं 'रिबिल्डिंग' करण्यासाठी जोशींनी नर्मदा परिक्रमा केली. त्याविषयी लेखिका म्हणते, कार्यकर्त्यांचा लवाजमा, मोबाइल फोन वगैरेंसह केलेली ती काही खऱ्या अर्थाने परिक्रमा नव्हतीच.

शतकातून एखादाच होणारा हा माणूस आहे, याची जाण लेखिकेला नवतरुण वयातही होती. तरी त्यांनी बोलावलं म्हणून भर उन्हात बडनेरा स्टेशनवर त्यांना भेटायला गेल्यावर त्यांनी केलेलं दुर्लक्ष तिला बोचतं. आणि ही बोच ती व्यक्त करते. त्यांचं गुरुमंत्र घेणं, त्यांचा अहंकार यांविषयीही ती परखड मतं नोंदवते, त्यामुळे हे पुस्तक एकेरी राहत नाही वा चरित्रात्मकही होत नाही.

लेखिकेची शैली वाचकाशी संवाद साधणारी, वेल्हाळ आहे. 'नेहमीची सकाळ. नेहमीचा दिवस. नेहमीचा चहा. नेहमीची कामं. नेहमीचं सगळं. पण दिवसानं ठरवलं होतं... आज नेहमीचा दिवस नाही व्हायचं...' अशी लय अनेक ठिकाणी सापडते. 'नाती कस मागत असतात तसंच जीवनही तुमचा कस बघत असतं...' असं ती ओघात लिहून जाते. तिचं कविताप्रेम, गझल-व्यासंग, त्या वयातला मोकळा धिटुकलेपणा आणि वृत्तीतली उत्कटता तिच्या शैलीतही उतरली आहे. १९७८ ते २०१५ या काळातल्या सहवासाची आणि संवादांची ही शब्दचित्रं आहेत. त्यामुळे काळाचा मागे-पुढे चालणारा खेळ निवेदनात आहे.

जोशींच्या अनुषंगाने इतरही काही माणसांची चित्रं धूसरपणे या पुस्तकात उमटली आहेत. लेखिकेची आई, भाऊ, जोशींच्या पत्नी लीलाताई, बबनमामा, म्हात्रेसर... वगैरे. काही तिने पाहिली, काही जोशींच्या नजरेतून. मात्र काही तपशील अधिकचे पुरवायला हवे होते. उदा. काशीकर आडनावाची काही माणसे प्रसंगाने येतात. ही लेखिकेची कोण असावीत- हे वाचकांचं कुतूहल सर्वच ठिकाणी शमत नाही. त्यामुळे त्याच्या मनात 'कल्लोळाचे अंश' बाकी राहतात!

एका तांत्रिक गफलतीचाही निर्देश करायला हवा. म्हटलं तर लहानशी. पण 'संदर्भसूची' या शीर्षकाखाली काही पुस्तकांची यादी शेवटी दिली आहे. ती 'यादी' आहे. सूची नव्हे. सूची ही संकल्पना आहे. सूचिशास्त्र चांगलं विकसित झालेलं आहे. तिची एक पद्धती आहे. (अर्थात, हे काही संशोधनपर लेखन नाही तरीही) याची नोंद पुढच्या आवृत्तीत जरूर घ्यायला हवी. असो.

शरद जोशींनी लेखिकेला एक पत्र लिहिलं होतं. या पुस्तकात ते समाविष्ट केलं आहे. त्या पत्रात जोशींनी म्हटल्याप्रमाणे लेखिकेने त्यांच्या सहवासातले कोणते प्रसंग शब्दांकित करायचे, ते निवडीचं स्वातंत्र्य घेतलेलं दिसतं आहे. आणि त्याचा विवेकानं आविष्कारही केला आहे. जोशींच्या अत्यंत प्रभावशाली व्यक्तिमत्त्वाच्या छायेखाली न येता पण समरसून आणि संयमाने हा शोध घेतला आहे, असा अनुभव वाचकाला येतो.

◆

**डॉ. वंदना बोकील-कुलकर्णी**
७, कुसुमकुंज सोसायटी,
प्रभात रस्ता, गल्ली क्र.५,
पुणे ४११ ००४.
चलभाष : ९८२२०३३५६२



अनुक्रमणिका





पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ. वर्षा तोडमल

# काळाचे भान देणारे 'कालचक्र' आणि डॉ. अरुण टिकेकर

■

सदर लेखनाच्या निमित्ताने केलेल्या स्फुटलेखांमधून डॉ. टिकेकर अतिशय मर्मज्ञ रसिकतेने जुन्या मौलिक ग्रंथांची ओळख करून देतात. एरिक ब्लेअर ऊर्फ जॉर्ज ऑरवेल यांच्या जागतिक वाङ्मयात आजही आपलं स्थान टिकवून ठेवणाऱ्या दोन कादंबऱ्या म्हणजे 'ॲनिमल फार्म' अन् 'नाइन्टीन एटी फोर'. विसाव्या शतकातील सर्वोत्तम वीस पुस्तके निवडली गेली, तेव्हा ऑरवेलच्या या दोन्ही कादंबऱ्यांना त्या विसात स्थान मिळालं. १९०३ मध्ये ब्रिटिश-हिंदुस्थानात जन्मलेल्या ऑरवेलच्या 'बर्मीज डेज' पुस्तकात सर्व तपशील मिळतो. वैश्विक सत्याचा आग्रह धरून लिहिणारा हा लेखक मात्र कालौघातही आपले स्थान कसा टिकवून राहतो, ते डॉ. टिकेकर आपल्या खास शैलीत सांगतात, अनेक दुर्मीळ इंग्रजी-मराठी पुस्तकांची ओळख या अभ्यासू ग्रंथप्रेमीने करून दिली आहे.

■

समाज-संस्कृती आणि इतिहासाचे भाष्यकार, ज्येष्ठ विचारवंत, निर्भीड पत्रकार, मुंबईच्या इतिहासाचे अभ्यासक डॉ. अरुण टिकेकर यांचं प्रस्तुत 'कालचक्र' हे पुस्तक त्यांच्या जन्मदिनी १ फेब्रुवारी २०१७ रोजी प्रकाशित झालं, पण त्यांच्या निधनापश्चात. जीवन-मरण हे 'कालचक्र' चालूच राहणार. जीवनाचा शेवट कसा आणि कधी होणार, हे कुणीच सांगू शकत नाही. पण आपल्यापुरती घालून घेतलेली 'तत्त्वं' आणि 'मूल्यं' यांचं काटेकोर पालन करणाऱ्या टिकेकरांना लेखन आणि पत्रकारितेची कौटुंबिक पार्श्वभूमी मुळातच लाभलेली. त्यांचे आजोबा केसरीत 'धनुर्धारी' या टोपणनावाने सदर लिहीत, त्यांचे काका श्री.रा. टिकेकर 'मुसाफिर' टोपणनावाने लिहीत तर वडील चिं. रा. टिकेकर हे 'दूत' या टोपणनावाने लिहीत. त्यामुळेच सदरलेखन आणि टोपणनावे यात टिकेकरांनाही विशेष रस होता. स्वतः लेखक हे 'दस्तुरखुद्द', 'टिचकीबहाद्दर', इ. नावांनी सदरलेखन करीत.

लेखकाच्या सदराविषयीच्या अनुभवाला एक किनार होती. स्वतःच्या सदर-लेखनाव्यतिरिक्त दशकाहून अधिक काळच्या 'लोकसत्ता'च्या संपादकीय कार्यकाळात त्यांची एकूण २२२ सदरं प्रसिद्ध झाली होती. हे करत असताना विविध गटातील वाचकवर्ग त्यांनी डोळ्यांसमोर ठेवला होता. गृहिणी, शिक्षक, युवकवर्ग, ज्येष्ठ नागरिक, लोकल गाडीने किंवा थोडा लांब पल्ल्याचा प्रवास करणारे नागरिक, तसेच दुपारची वामकुक्षी करताना वाचणाऱ्यांपासून ते त्या लेखनाचं अभ्यासपूर्ण मनन करणाऱ्यांपर्यंत वाचकांच्या विविध गटांना रुचेल, पचेल अशा रीतीने सदरांची आखणी त्यांनी केलेली दिसते. त्यातही हलकेफुलके, दैनंदिन जीवनातले अनुभव यांपासून माहितीपर, वैचारिक, प्रबोधनपर असं वेगवेगळ्या स्तरांवरचं लेखन त्यांनी आणलं होतं. संवादपर, बोलीभाषेबरोबर सहजसोपं आणि विचारप्रवृत्त करणारं आणि म्हणून थोडं अवघड भाषेतील लेखनही लोकसत्तातील 'तारतम्य' सदरातून केलं होतं. त्यावर डॉ. रा. भा. पाटणकर म्हणाले होते की, 'गंभीर निबंध' हा प्रकार मधल्या काळात मराठीत दुर्मीळ झाला होता, तो या सदरामुळे परत आला! आपल्या १० वर्षांच्या कारकिर्दीत 'लोकसत्ता' या दैनिकाला एका वेगळ्या उंचीवर नेऊन ठेवणारे कल्पक संपादक म्हणून सर्वसामान्य वाचकांना श्री. अरुण टिकेकर हे नाव माहीत होतेच.

'अस्वस्थ महाराष्ट्र', 'जनमन', 'समाजस्पंदन', 'स्थलकाल', 'इति-आदि', 'विवेचन', 'सारांश', 'कालमीमांसा', सामाजिक आणि सांस्कृतिक



अनुक्रमणिका








पडझडीचा आलेख 'कालान्तर'मधून मांडून तारतम्याने लिहिणारे विद्वान संपादक डॉ. अरुण टिकेकर यांनी आपली कारकीर्द शिक्षक म्हणून सुरू केली. काही वर्षे महाविद्यालयात व्याख्याता म्हणून काम केले. पत्रकारितेतील त्यांची कारकीर्द 'टाइम्स ऑफ इंडिया'मधून सुरू झाली. दीडशे वर्षे जुन्या 'जुन्या टाइम्स ऑफ इंडिया'चा अधिकृत इतिहास लिहिणाऱ्यांमध्ये त्यांचा मोलाचा वाटा होता. कालांतरानं 'महाराष्ट्र टाइम्स'मध्ये वरिष्ठ साहाय्यक संपादक पदावर रुजू झालेल्या टिकेकरांनी नंतर मागं वळून पाहिलं नाही.

प्रखर बुद्धिवादाचे पुरस्कर्ते असलेल्या टिकेकरांनी आपल्या सव्यसाची लिखाणाने संपादकपदाला एक उंची प्राप्त करून दिली होती. वेळोवेळी होत असलेल्या सामाजिक बदलांना लेखणीतून अधोरेखित केलं होतं.

'एखाद्या वृत्तपत्रासाठी दररोज सदर लिहिण्याची जोखीम उचलायला अनुभवी साहित्यिकसुद्धा फारसे उत्सुक नसतात. दररोज विषय शोधणं आणि त्यावर ठरावीक शब्दात लिहिणं ही आगळी-वेगळीच शिस्त असते. हा प्रकारच सर्वार्थाने वाचकांकडून घेतल्या जाणाऱ्या परीक्षेला बसण्याचा आहे'- असे मानणारे टिकेकर दररोज परीक्षेला बसायचे आव्हान लीलया स्वीकारताना दिसतात. आणि 'लोकमत'मध्ये सहाहून अधिक महिने 'कालचक्र' हे दैनिक सदर लिहितात.

दुर्मीळ पुस्तकांची शोध घेण्याची लेखकाची हातोटी वाखाणण्यासारखीच. एका पुस्तकाचा संदर्भ त्यांना मिळाला होता पण नामवंत ग्रंथालयात धुंडाळूनही पुस्तक काही मिळालं नव्हतं. कसं मिळणार? त्या पुस्तकावर तत्कालीन ब्रिटिश सरकारनं बंदी आणली होती. 'इंडिया इन 1983'. पुस्तक प्रसिद्ध झालं होतं १८८३ मध्ये. म्हणजे शंभर वर्षांत आपल्या देशात काय घडू शकतं, याचं ते भाकीत असावं. भाकीत ऐकायला, वाचायला कुणाला आवडत नाही? म्हणूनच त्या पुस्तकाबद्दल औत्सुक्य वाढत राहतं. हरयाणातल्या गुरगावापासून कर्नाटकातल्या बंगलोरपर्यंत लेखक पुस्तकाची शोधयात्रा करतात. आणि एक दिवस ग्रँट रोड स्टेशनच्या बाहेर जिथं पूर्वी सेंट्रल बुक डेपो नावाचं जुन्या पुस्तकांचं दुकान होतं, मालकानं आपला ग्रंथव्यवसायसुद्धा सोडला होता. एका कोपऱ्यात न विकली गेलेली पुस्तकं मोडक्या, लुडकत्या शेल्फवर धुळीने माखलेल्या अवस्थेत पडली होती- ती विकण्यातही मालकाला स्वारस्य नसावं. कित्येक वर्षं शोधत असलेलं 'इंडिया इन 1983' हे पुस्तक टिकेकरांना १० रुपयांना मिळालं आणि कालचक्राची सुरुवात 'बाबू पार्लमेंट' या स्फुट लेखानं झाली. असा हा दुर्मीळ ग्रंथप्रेमी.

सदर लेखनाच्या निमित्ताने केलेल्या स्फुटलेखांमधून डॉ. टिकेकर अतिशय मर्मज्ञ रसिकतेने जुन्या मौलिक ग्रंथांची ओळख करून देतात. एरिक ब्लेअर ऊर्फ जॉर्ज ऑरवेल यांच्या जागतिक वाङ्मयात आजही आपलं स्थान टिकवून ठेवणाऱ्या दोन कादंबऱ्या म्हणजे 'ॲनिमल फार्म' अन् 'नाइन्टीन एटी फोर'. विसाव्या शतकातील सर्वोत्तम वीस पुस्तके निवडली गेली, तेव्हा ऑरवेलच्या या दोन्ही कादंबऱ्यांना त्या विसात स्थान मिळालं. १९०३ मध्ये ब्रिटिश-हिंदुस्थानात जन्मलेल्या ऑरवेलच्या 'बर्मीज डेज' पुस्तकात सर्व तपशील मिळतो. वैश्विक सत्याचा आग्रह धरून लिहिणारा हा लेखक मात्र कालौघातही आपले स्थान कसा टिकवून राहतो, ते डॉ. टिकेकर आपल्या खास शैलीत सांगतात, अनेक दुर्मीळ इंग्रजी-मराठी पुस्तकांची ओळख या अभ्यासू ग्रंथप्रेमीने करून दिली आहे.

मराठी माणसाच्या भवितव्याचा प्रश्न व्यापकदृष्ट्या विचारात घेतात, मराठी माणूस का निस्तेज झाला आहे? आपल्या व्यवसायाचा अभिमान गमावून बसलेले,





- पुस्तकाचे नाव - कालचक्र
- लेखक - अरुण टिकेकर
- प्रकाशक - रोहन प्रकाशन
- मूल्य - २००रु.

दुर्मुखलेले शिक्षक-प्राध्यापक आणि त्यांचे वैचारिक दारिद्र्य, साहित्यिक-कलावंतांची स्वार्थी व कातडीबचाऊ मनोवृत्ती, प्रकाशकांचे बाजारू धोरण, वकील-डॉक्टरांची आपल्या व्यवसायावरील ढळलेली निष्ठा अन् त्यातून उद्भवलेला त्यांचा मतलबीपणा, हे सर्व मराठी माणसाच्या प्रगतीत कशी बाधा उत्पन्न करतं. आपल्याला व्यवसायाभिमानातून मराठी अस्मिता जागृत होऊन राष्ट्रीय शील कसे घडत जाईल, यावरही श्री. टिकेकर प्रकाश टाकतात.

वृत्तपत्राचा संपादक कसा असावा, संपादकाचा आपल्या अधिकाराबाबत दृष्टिकोन कसा असावा? ह्याचे पॉल जॉन्सननं केलेलं वर्णनही ते सांगतात - 'सॅक मी इफ यू मस्ट; बट टिल देन लीव्ह मी अलोन' (मला काढून टाकायचं असेल, तर अवश्य काढून टाका; पण तोपर्यंत मला पूर्ण स्वातंत्र्य द्या) असं म्हणण्याचं धाडस करण्यासाठी संपादकाला नैतिक अधिकार मिळवावा लागतो. असा नैतिक अधिकार एखाद्याकडे कसा येतो? तो मिळतो की मिळवावा लागतो? याची मार्मिक उदाहरणे अरुण टिकेकर देतात. राष्ट्रीय काँग्रेसच्या शतकमहोत्सवी अधिवेशनासाठी एक स्मरणिका तयार करण्याचं काम सुरू होतं. 'टाइम्स ऑफ इंडिया'च्या संदर्भ विभागात महात्मा गांधींचं एक पत्र सापडलं. अक्षरशः एका ओळीचं असावं. त्यांनी टाइम्सच्या ब्रिटिश संपादकाच्या एका टिप्पणीवर विरोधी सूर लावणारा लेख पाठवला होता. त्यासोबतच हे पत्र होतं. महात्मा गांधीच्या शब्दांना नैतिकतेची जरब कशी होती, हे सांगणारं पत्र असं होतं- 'डिअर एडिटर, यू विल यूज धिस अॅज इट इज, ऑर रिजेक्ट इट ऑल टुगेदर. युवर्स, एम. के. गांधी.' एवढंच ते पत्र. 'प्रिय संपादक, हा लेख तुम्ही जसाच्या तसा म्हणजे फेरफार न करता छापणार आहात, अन्यथा परत करणार आहात. तुमचा मो. क. गांधी.' त्याच पत्रावर कोपऱ्यात 'पास्ड फॉर पब्लिकेशन', असा संपादकाचा शेरा अन् सही होती. ही अशी धीट नैतिकता येते कुठून?

कार्यक्षमता, 'वर्क इज वर्शिप' (काम हाच परमेश्वर) आणि त्या कार्यनिष्ठेतूनच नैतिकतेचा अधिकार प्राप्त करून देणारी अनेक उदाहरणे लेखकाने 'कालचक्र'मध्ये दिली आहेत.

वृत्तपत्रसृष्टीत काम करताना दररोज नव्याने येणाऱ्या असंख्य अडचणी, त्यावर मात करून वृत्तपत्र तयार करणं, हे पत्रकारांपुढचं आव्हानच; पण अशा आव्हानांमुळेच त्यांच्या आयुष्यात वृत्तपत्रव्यवसाय रोमहर्षक क्षण निर्माण करून गेला- 'ते क्षण जो अनुभवू शकत नाही, तो जातीचा पत्रकार नाही. आता सारं बदललं आहे. पण म्हणून आव्हानं कमी झालेली नाहीत. तंत्र बदललं तरी व्यवसायाचा आत्मा तोच आहे. तोच राहणार आहे,' असे लेखकाने म्हटले आहे. पत्रकारितेच्या पेशाची तांत्रिक बाजू, त्याचे व्यवस्थापन याची त्यांना सखोल माहिती होती.

सरकारचं काही खरं नाही, 'ओरिजनल ते ओरिजनल, अनुकरण ते अनुकरण, बाबू पार्लमेंट, आपल्या लेखकांना ग्लॅमर का नाही? मदिराप्राशन अन् ग्रंथवाचन' इ. ऐंशी स्फुट लेखांचे कालचक्र वाचकाला चिंतनप्रवृत्त करते. औत्सुक्य चाळवणारी आकर्षक शीर्षकं हे त्यांचे वैशिष्ट्य. वाचकांना द्यायचं तर काही तरी नवीनच द्यायचं हा टिकेकरांचा ध्यास कालचक्रमध्येही जाणवतो. लेखक म्हणतात की 'दैनिक सदर 'डेली सोप'सारखं असतं, कोठून कोठे जाईल हे आधी सांगता येत नाही.'

गाढे अभ्यासक, संशोधक, संपादक-लेखक असे बहुआयामी व्यक्तिमत्त्व आज नाही. त्यांचे 'कालांतर' हे ते जाण्यापूर्वी नुकतेच काही दिवस आधी प्रकाशित झालेले पुस्तक. या पुस्तकाबरोबरच 'कालचक्र', 'इति-आदि' या पुस्तकांचे काम पूर्ण झाले होते. पण 'कालचक्र' हे त्यांच्या निधनानंतर प्रकाशित झालेले पुस्तक. समाजमानसात घडत असलेल्या बदलांकडे, वृत्ती-प्रवृत्तींकडे अत्यंत बारकाईने कसे बघावे याची साक्ष यातील प्रत्येक लेख देतो. कालचक्र आणि इति-आदी प्रकाशनाच्या वाटेवर असताना डॉ. अरुण टिकेकर गेले पण त्यांचे लेख क्षणाक्षणाला वेगाने फिरत राहणाऱ्या 'कालचक्रा'चं भान देतात!

◆

**प्रा. डॉ. वर्षा तोडमल**
आबासाहेब गरवारे महाविद्यालय,
कर्वे रोड, पुणे -४
चलभाष : ९०९६९५१२००



पुस्तक परीक्षण

**नीलिमा बोरवणकर**

# विरंगी मी विमुक्त मी

■

**लेखिकेच्या मानसशास्त्राच्या अभ्यासामुळे तिनं अनेक पातळ्यांवर बेटीच्या वागण्याबद्दलची अनुमानं काढायला सुरुवात केली. त्यावरून तिनं निष्कर्ष काढला की जेव्हा व्यक्तीचा वैचारिक पाया भक्कम असतो, तेव्हाच त्या विचारांवर ती अविचल धारणा दाखवू शकते. पुढचा टप्पा, बेटीचे नेमके वैचारिक अधिष्ठान शोधणे, त्यासाठी तिच्या जीवनातले प्रभावशाली प्रवाह शोधणे. त्याचा मागोवा घेताना दोन ठळक प्रवाह सापडले, ते होते- चित्रकलेचं शिक्षण आणि स्त्रीवादी चळवळीतला तिचा सहभाग.**

■




**वि**रंगी मी! विमुक्त मी! या कुतूहल निर्माण करणाऱ्या शीर्षकामुळे, अत्यंत देखण्या मुखपृष्ठामुळे आणि अंजली जोशी या लेखिकेच्या नावामुळे अतिशय उत्सुकतेनं ही कादंबरी हातात घेतली आणि खूप महत्त्वाचं, चांगलं काही वाचल्याचं मन:पूत समाधान देऊन गेली.

अंजली जोशी या मानसशास्त्रज्ञ असल्यानं, अल्बर्ट एलिस या विख्यात मानसशास्त्रज्ञाच्या लेखनाचा अभ्यास करत असताना, त्याचं कामप्रेरणेवरचं लेखन वाचत असताना बेटी डॉडसन या नावाशी त्यांचा प्रथम परिचय झाला. हस्तमैथुनाच्या तंत्रांमध्ये तिनं शोधून काढलेली तंत्रं किंवा अपराधमुक्त हस्तमैथुन हे मानसिक आरोग्यासाठी आवश्यक आहे हे तिचं मत इत्यादीचा उल्लेख अल्बर्ट एलिस यांना करावा वाटतो, याचा अर्थ ही तंत्रे निश्चितच फलदायी असणार हे जाणवल्यामुळे लेखिकेच्या मनात बेटी डॉडसन या नावाविषयी कुतूहल जागं झालं.

तिची जी काही थोडीफार माहिती मिळाली त्यातून कळलं की १९२९ मध्ये अमेरिकेतल्या कँसस शहरातल्या विचिटा या लहान गावात तिचा जन्म झाला. चित्रकलेची आवड तिला न्यूयॉर्कला घेऊन गेली. पुढे न्यूयॉर्क हीच तिची कर्मभूमी झाली. स्त्रीवादी चळवळीत काही वर्षं तिनं काम केलं. स्त्रियांच्या लैंगिकतेशी तिनं जवळून परिचय करून घेतला. स्वतःचं लैंगिक सुख मिळवण्याचा अधिकार प्रत्येक स्त्रीला आहे. लैंगिक सुखासाठी पुरुषाची साथ मिळाली तर उत्तम, पण तशी ती मिळाली नाही तरी ती स्वतःचे कामसुख हस्तमैथुनाद्वारे उत्तमरीत्या प्राप्त करून घेऊ शकते, हे तिचे प्रमुख आणि खळबळजनक विचार. या विचारांचा पुरस्कार करण्यासाठी स्वतःच्या कामक्रीडांच्या चित्रांचं प्रदर्शन न्यूयॉर्कमध्ये भरवून तिनं अनेकांचा रोष ओढवून घेतला. कारण हा विषय तेव्हा अमेरिकेत सुद्धा निषिद्ध होता, त्यात ही चित्रं एका स्त्रीनं काढली असल्यामुळे 'पोर्न आर्टिस्ट'चा शिक्का तिच्यावर बसला. त्यामुळे मुख्य प्रवाहातल्या स्त्रीवाद्यांनी तिला लांब ठेवलंच त्याबरोबर बुद्धिजीवी वर्तुळातही तिचं नाव कधी आदरानं घेतलं गेलं नाही.

लैंगिक मुक्ती ही स्त्रियांच्या मुक्तीचा केंद्रबिंदू आहे व लैंगिक मुक्तीचा केंद्रबिंदू आहे हस्तमैथुन, असं म्हणणाऱ्या धारिष्ट्यवान स्त्रीच्या जीवनाविषयीच्या अपार कुतूहलामुळे लेखिकेनं बेटी डॉडसनची पुस्तकं अमेरिकेतून मागवून अभ्यास सुरू केला. पण निराशाच पदरी पडली, कारण



अनुक्रमणिका







यातलं लेखन बऱ्यापैकी सामान्य, अनेक जोडीदारांसोबतच्या कामक्रीडांच्या तपशीलवार वर्णनांनी भरलेलं किंवा पार्टीला जाताना कोणती केश-वेशभूषा केली, असं रटाळ, अनावश्यक स्वरूपाचं वाटलं. तिला मिळालेला पोर्न स्टार हा शिक्का योग्यच होता की काय, ही शंका सुद्धा लेखिकेला आली.

पण तरीही बेटी डॉडसनचा विचार लेखिकेच्या मनातून जाईना. ५० हून अधिक वर्षांपूर्वी ही स्त्रियांच्या लैंगिकतेचा उच्चार करते, त्यासाठी चाकोरी झुगारून देते आणि स्वतःच्या विचारांवरच्या अव्यभिचारी निष्ठेनं आयुष्यभर चालत राहते. स्त्रियांची कामवासना एकतर त्यांना गुलाम करते, म्हणजे पुरुषाचे परावलंबित्व स्वीकारायला लावते किंवा त्यांना विमुक्त करते. मी स्वतःला विमुक्त करण्याचा निर्णय घेतला, असं म्हणणारी बेटी डॉडसन तिच्या हस्तमैथुनाच्या विचारांसह लेखिकेच्या मनात वास्तव्याला आली.

त्याकाळचा तो विचार आजच्याही असंख्य स्त्रियांना लागू पडतो, हे वास्तव लक्षात आलं. घटस्फोटित, विधवा, अविवाहित, जोडीदार दूरदेशी असणाऱ्या किंवा जोडीदार असूनही लैंगिक अनुरूपता नसणाऱ्या स्त्रिया या विषयावर मोकळेपणाने बोलूही शकत नाहीत. कित्येक जणींना स्त्री हस्तमैथुन करू शकते किंवा तिला कामतृप्तीचा उत्कर्षबिंदू येऊ शकतो, याचा पत्ताच नसतो. स्त्रियांची असली मानसिकता सभोवताली दिसत असताना अनेक वर्षांपूर्वी स्त्रीला कामसुखात आत्मनिर्भर करणारी बेटी डॉडसन लेखिकेच्या डोक्यात ठाण मांडून बसली.

तिचे निर्भीड विचार आणि तिचं लेखन यांचा मेळ मात्र जमेना. लेखिकेचं मानसशास्त्रज्ञ असणं इथे उपयोगाचं ठरलं असणार. तिनं बेटीच्या व्यक्तिमत्त्वाचा घाट वेगळा असणार, तो समजून घ्यायचं ठरवलं.

तिचं व्यक्तिमत्त्व कृतिप्रधान, बहिर्मुख असणार. तिचे विचार लेखनातून शोधण्यापेक्षा कृतीतून शोधायला हवेत. म्हणजे तिच्या कृतीचा अन्वयार्थ लावत व्यक्तिमत्त्वाचा वेध घेणं. तिच्या जीवनात व्यापून राहिलेला विशेष म्हणजे तिच्यातलं असाधारण धैर्य. भीती किंवा संकोच हे शब्दच तिच्या शब्दकोशात नाहीत. कुठलाच अनुभव तिनं नाकारला नाही.

लेखिकेच्या मानसशास्त्राच्या अभ्यासामुळे तिनं अनेक पातळ्यांवर बेटीच्या वागण्याबद्दलची अनुमानं काढायला सुरुवात केली. त्यावरून तिनं निष्कर्ष काढला की जेव्हा व्यक्तीचा वैचारिक पाया भक्कम असतो, तेव्हाच त्या विचारांवर ती अविचल धारणा दाखवू शकते. पुढचा टप्पा, बेटीचे नेमके वैचारिक अधिष्ठान शोधणे, त्यासाठी तिच्या जीवनातले प्रभावशाली प्रवाह शोधणे. त्याचा मागोवा घेताना दोन ठळक प्रवाह सापडले, ते होते- चित्रकलेचं शिक्षण आणि स्त्रीवादी चळवळीतला तिचा सहभाग.

कलेचं शिक्षण माणसाला व्यापक जीवनदृष्टी मिळवून देऊन गतानुगतिक विचारसरणीतून बाहेर काढते. बेटी कामप्रेरणेविषयी जो उघड उच्चार करते, त्यामागे हे कलेचं शिक्षण असणार, या निष्कर्षाप्रत लेखिका पोचली. त्याचबरोबर बेटीच्या काळातल्या अमेरिकेतल्या स्त्रीवादी चळवळीचाही लेखिकेनं अभ्यास केला. या दोन्ही प्रवाहांच्या अभ्यासानंतर बेटीचं वैचारिक अधिष्ठान सुस्पष्टपणे साकार झालं आणि त्यानंतरचा टप्पा प्रत्यक्ष लेखनाचा.

अंजली जोशी यांनी अल्बर्ट एलिसप्रमाणेच याही पुस्तकाला कादंबरीचाच रूपबंध स्वीकारला. त्यामुळे त्यांना सृजनात्मक स्वातंत्र्य घेता आलं.

> **“ बेटीचं आयुष्य विलक्षण ध्यासानं भारलेलं आहे. अखेर ती म्हणते, आपल्याला जे समजलं ते आपण इतरांना सांगितलं. त्यांना वाटत होतं ते काहीतरी गूढातलं, अंतर्यामीचं, रहस्यमय आहे. पण त्यात रहस्य नव्हतं. आपण स्वतःला फक्त ओळखत गेलो. सुखाचा अक्षय ठेवा आपल्या आतच होता, तो शोधायला बाहेर कुणाची गरजच नव्हती. आपण स्वयंपूर्ण, स्वतंत्र होतो, कुणाची गुलामी पत्करायची गरजच नव्हती. आपण मनःपूर्वक जगलो, सुखी झालो आणि इतरांनाही सुखी करण्याचा प्रयत्न केला. आयुष्यभर एका वेगळ्याच ध्येयाचा पाठपुरावा करणाऱ्या बेटीची ही जीवनकहाणी आपल्याला एक निराळंच जग दाखवते. विचार करायला प्रवृत्त करते. आपण आपल्याच शरीराकडे, मानसिकतेकडे, सामाजिक वातावरणाकडे एका नव्या नजरेनं पाहू लागतो. ”**

यातल्या नायिकेचं नाव बेटीच आहे, तिचं विचिटा हेच जन्मठिकाण, पुढे शिक्षणासाठी न्यूयॉर्कला जाणं, हे तपशील प्रत्यक्षातले असले तरी त्यातल्या असंख्य घटना, प्रसंग काल्पनिक आहेत. नायिकेची वैचारिक, भावनिक वाटचाल काल्पनिक आहे, असं लेखिका सुरुवातीच्या मनोगतात स्पष्ट करते.

ही कादंबरी वाचताना आपण त्यात पूर्णतः गुंतत जातो. अमेरिका आपल्याला नवी नाही, पण यात जो काळ दाखवला आहे- बेटीचा जन्म १९२९चा, आणि तिथून पुढचा तिचा उमेदवारीचा काळ- त्या वातावरणात लेखिका आपल्याला मस्त फिरवते. त्या काळातलं अमेरिकेतलं कौटुंबिक, सामाजिक वातावरण, चित्रकलेच्या प्रांतातले, स्त्री चळवळीतले प्रवाह अत्यंत सहजपणे रंगवले आहेत. सामाजिक वातावरणाचा कौटुंबिक आणि भावनिक स्तरांवरचा परिणाम अत्यंत स्वाभाविकरीत्या आपल्यापर्यंत पोचतो. त्यावेळच्या स्त्रियांवरची बंधनं आणि मुक्तता वाचताना भारतातली स्त्री तेव्हा कुठल्या परिस्थितीत जगत होती, ही तुलना नकळत मनातल्या मनात केली जाते. स्त्री जगाच्या कुठल्याही भागात असली तरी तिच्यातल्या स्त्रीत्वाच्या अदृश्य धाग्यानं ती कशी बांधलेली असते, त्याचंही भान पुन्हा येतं.

चरित्रात्मक कादंबरी या स्वरूपामुळे, हा प्रसंग खरंच घडला असेल की ही लेखिकेची कल्पनाशक्ती असेल, हा आपल्या मनाचा खेळ सतत सुरू राहतो. यातले अनेक प्रसंग आपल्या भारतीय मानसिकतेचा विचार करता आज पन्नास वर्षांनंतरही अशक्य वाटतात.

उदाहरण द्यायचं तर बेटी सत्तरीच्या उंबरठ्यावरच्या आपल्या आईला विचारते, 'आई तुला ऑरगॅझम येतो का गं?' एवढं विचारून ती थांबत नाही तर आईला फोनवरून हस्तमैथुनाचे धडे देते. सुरुवातीला आई आढेवेढे घेते पण नंतर ती बेटीनं शिकवलेल्या तंत्रानं हस्तमैथुन करू लागते आणि त्यामुळे रात्री तिला शांत झोप लागते.

असे अजूनही काही प्रसंग या कादंबरीत आहेत. ते वाचताना खरंच असं घडू शकतं, असे प्रश्न मनात उमटतात. मग परदेशी मानसिकतेच्या परिप्रेक्ष्यातून या प्रसंगांकडे बघायला हवं, याची जाणीव होते आणि लेखिकेच्या कल्पनाशक्तीला दाद द्यावी वाटते.

बेटी आणि तिच्या मैत्रिणी सेक्शुअल कॉन्शसनेस रेझिंग ग्रुप्स चालवून सकारात्मक लैंगिकतेचे अनेक विषय हाताळत असत. गटचर्चा, नाटुकली, प्रश्नोत्तरे असं त्यांचं स्वरूप असे. पण एवढं पुरेसं न वाटल्यानं ठोस कृतीसाठी लैंगिकतेचं प्रत्यक्षाधिष्ठित प्रशिक्षण देणाऱ्या कार्यशाळा त्यांनी सुरू केल्या. 'टीचिंग सेक्स बाय डुइंग सेक्स' हे त्या कार्यशाळेचं ब्रीदवाक्य.

स्वतःच्या जननेंद्रियांची लाज काढून टाकून त्याकडे सकारात्मकतेनं बघायला शिकवणं आणि नंतर हस्तमैथुन ही लैंगिक ज्ञान मिळवण्याची गुरुकिल्ली आहे, याची जाणीव करून देऊन कामजीवनाचा आनंद वृद्धिंगत करणं, हे कार्यशाळेचं उद्दिष्ट.

या कार्यशाळेतले अनुभव मुळातून वाचण्यासारखे आहेत.

बेटीचं आयुष्य विलक्षण ध्यासानं भारलेलं आहे. अखेर ती म्हणते, आपल्याला जे समजलं ते आपण इतरांना सांगितलं. त्यांना वाटत होतं ते काहीतरी गूढातलं, अंतर्यामीचं, रहस्यमय आहे. पण त्यात रहस्य नव्हतं. आपण स्वतःला फक्त ओळखत गेलो. सुखाचा अक्षय ठेवा आपल्या आतच होता, तो शोधायला बाहेर कुणाची गरजच नव्हती. आपण स्वयंपूर्ण, स्वतंत्र होतो, कुणाची गुलामी पत्करायची गरजच नव्हती. आपण मनःपूर्वक जगलो, सुखी झालो आणि इतरांनाही सुखी करण्याचा प्रयत्न केला. आयुष्यभर एका वेगळ्याच ध्येयाचा पाठपुरावा करणाऱ्या बेटीची ही जीवनकहाणी आपल्याला एक निराळंच जग दाखवते. विचार करायला प्रवृत्त करते. आपण आपल्याच शरीराकडे, मानसिकतेकडे, सामाजिक वातावरणाकडे एका नव्या नजरेनं पाहू लागतो.

कादंबरीचा शेवट 'तिनं डोळे मिटून घेतले. गडद लालसर रंगाचा पडदा तिच्या मिटल्या पापण्यांआड पसरला. काही क्षण रंगांचा कल्लोळ उसळत राहिला, हळूहळू ते सगळे रंग एका शुभ्रपणात विरून गेले आणि त्या प्रकाशमान वर्तुळात ती(बेटी) समाधानानं विहरत राहिली.'

कादंबरी वाचून हातातून खाली ठेवली तेव्हा माझी नेमकी हीच अवस्था झाली होती.

◆

**नीलिमा बोरवणकर**
१२, रघुकुल सोसायटी,
गिरिजा शंकर विहार समोर.
कर्वेनगर, पुणे ४११०५२
चलभाष : ९८२२५५६२५१



लेख

प्रा. विद्या सुर्वे बोरसे

# फेसबुक आणि मराठी साहित्य

**फेसबुक आमच्या कथा कादंबरी आणि कवितांच्या विश्वात आपले स्थान कसे बळकट करत चालले आहे. 'लॉग आउट' ही श्रुती आवटे या युवा लेखिकेची कादंबरी. ही कादंबरी लिहिली तेव्हा श्रुती दहावीत शिकत होती. पौगंडावस्था, या वयातील जग, अभ्यास, मित्र, प्रेम अशा विविध अंगांना ही कादंबरी स्पर्श करते. फेसबुक आणि मोबाईल हे या वयातील जगण्याचे महत्त्वाचे अवयव म्हणून कादंबरीत अवतरले आहेत. मोबाईल फोन, मेसेजेस, फेसबुक, चॅटिंग या सगळ्या सुरूप आणि कुरूप बाजुंना 'लॉग आउट' ने कवेत घेतले आहे.**



१.

मूड बदलण्यासाठी ती फेसबुकवर बसली. तिला जिया शेखची फ्रेंड रिक्वेस्ट आली होती. तिनं ती ॲक्सेप्ट केली. आयुष ऑनलाईन होताच.

हशू हळ आयुषची चॅटिंग विंडो ओपन झाली.

हळ जान्हवी.

kay mhanates? Am`wf.

kahi nahi. Tuzya jiyachi request aali hoti. Ti accept keli. Ok na? OmÝhdr.

Ho ka! Thike.. Thike.. Am`wf

एवढ्यात जिया ऑनलाईन आली.

Hi Janhavi जियाची चॅट विंडो ओपन झाली.

जान्हवीने जियाचा मेसेज वाचला पण रिप्लाय केला नाही..

Hi जियाचे मेसेजेस पाठवणं सुरूच होतं.

. Bolu.. tichyaashi? जान्हवी आयुषच्या परवानगीशिवाय जियाशी बोलायला तयार नव्हती.

okay.. bol na Am`wf

Hi bolo jiya जान्हवीने जियाच्या मेसेजला रिप्लाय केला.

how are you? जिया.

Great! What about you. जान्हवी

Thik Thak.. ayush ke bina suni suni..

Tum to acchi hogi na aayush ke sath? जिया.

जान्हवीने काहीच रिप्लाय केला नाही. तिलाच माहीत नव्हतं, तिला नेमकं काय हवंय! मात्र तिला हे चॅटिंग करताना कसंतरी होत होतं. (पृष्ठ ८४-८५)

.

इतक्यात मेसेजचा टोन वाजला.

Hii, Janhavi समीरचा मेसेज.

Sorry pan ag. Tumachyat bagh te Jiya Shekhach kahitaree zal hot. समीर.

Ho, tyach kay zaal? जान्हवी

ag te Fb varacha fake account aahe. समीर.

kaay? Mhanaje, kashavarun mhanatoyas tu he? जान्हवी



अनुक्रमणिका







एकदम उडालीच.

g, Jiya Shekh navachi koni vyaktich naahiye. te account ayushanech create kelay समीर.

kharach sangatoyas? I mean, are you sure? जान्हवीने पुन्हा एकदा चेक करण्यासाठी समीरला विचारलं.

ag ho mi aattaach pahilay tyala, te account use karatana. समीर. (पृष्ठ १४०)

.

आयुष, इंटरनेटवरची जिया शेख खोटी असेलही; ते अकाऊण्ट फेक असेलही; पण माझ्या आयुष्यात आलेल्या या फेक अकाउण्टचे मी काय करू? माझ्या मनातला आयुष खूप वेगळाय रे आणि वास्तवातला त्याहून खूप दूर.

आयुष, जियाचं अकाउण्ट फेक होतंच रे; पण आजच्या घडीला तू माझ्या आयुष्यातील फेक अकाउण्ट आहेस.

आता मात्र, हलकेच मला माझा हात यातून बाजूला घ्यावा लागणार आणि या आयुष नामक फेक अकाउंटवरून लॉग आउट व्हावं लागणार.

तुला कळतंय का आयुष? मी लॉग आउट होतेय.

(पृष्ठ १४१-१४२)

२

तिच्या नकळत
तो तिचे अकाऊंट
चेक करतो म्हणून
तिने पासवर्ड बदलला खरा,
पण विश्वासाच्या नात्याला
ठेच पोहोचलीच-
त्याचे ओरखडे
त्यांच्या लाईफलाईनवर
डाऊनलोड होत राहिले-
हाय, टी.सी., असे शॉर्टफॉर्म
संवादातून हरवले-
तो असं का वागतो
याची लिंकच तिला लागेना-
शेवटी तिने त्याला
स्पष्टच विचारले
तो हबकला खरा
पण त्याने तिला पासवर्ड सांगण्याचा
पुन्हा आग्रह केला.

(पासवर्ड, राज चिंचणकर, पुरुषस्पंदन, दिवाळी २०१३)

फेसबुक आमच्या कथा कादंबरी आणि कवितांच्या विश्वात आपले स्थान कसे बळकट करत चालले आहे, याचा निर्देश करणारी ही दोन प्रातिनिधिक उदाहरणे वरती दिली आहेत. 'लॉग आउट' ही श्रुती आवटे या युवा लेखिकेची कादंबरी. ही कादंबरी लिहिली तेव्हा श्रुती दहावीत शिकत होती. या कादंबरीची नायिका जान्हवी ही सुद्धा दहावीचीच विद्यार्थिनी आहे. पौगंडावस्था, या वयातील जग, अभ्यास, मित्र, प्रेम अशा विविध अंगांना ही कादंबरी स्पर्श करते. फेसबुक आणि मोबाईल हे या वयातील जगण्याचे महत्त्वाचे अवयव म्हणून कादंबरीत अवतरले आहेत. मोबाईल फोन, मेसेजेस, फेसबुक, चॅटिंग या सगळ्या सुरूप आणि कुरूप बाजुंना 'लॉग आउट' ने कवेत घेतले आहे. लॉग आउट ही संकल्पनाही फेसबुकच्याच विश्वातील. फेसबुक आणि मोबाईल चॅटिंगच्या जगातील विशिष्ट शब्दप्रयोग 'लॉग आउट' मध्ये जागोजागी भेटतात. उदाहरणार्थ- जानू, हम्म्म, हॉवीज, शेअर, बाय, मेसेज, रिप्लाय, डियर इ. मराठी भाषा रोमन लिपीत लिहिणे हे चॅटिंग करताना सहजपणे घडते. श्रुतीने हे सगळे फारच नीटपणे पकडले आहे.

फेसबुक आणि इतर सोशल नेटवर्किंग साईटच्या कुरूप अंगाकडे चिंचणकर यांची कविता निर्देश करते. वरती उल्लेख केलेली 'पासवर्ड' किंवा 'फेसबुकवरील बी एफ' ही त्यांची दुसरी कविता, या कवितांचा या अनुषंगाने उल्लेख करता येईल.

फेसबुकमुळे मानवी नात्यामध्ये प्रस्थापित झालेला विसंवाद हा चिंचणकरांच्या कवितेचे केंद्र आहे. फेसबुक वरील बीएफ अर्थात बॉय फ्रेंड हे नाते कसे अल्पजीवी असते हे काव्यात्म रीतीने राज चिंचणकरांनी मांडले आहे.

वरील दोन्ही उदाहरणांचा सविस्तर उल्लेख करण्याचे कारण एकच की फेसबुक हे आमच्या दैनंदिन जीवनाचा बरा वाईट भाग झाले आहे, हे लक्षात यावे. कोणत्याही बाबी जेव्हा मानवी जीवनाचा असा भाग होतात, तेव्हा त्यांचे प्रतिबिंब साहित्यात उमटणे साहजिक आहे, वरील उदाहरणातून ते ध्यानात येईल.

फेसबुक ही सोशल नेटवर्किंग वेबसाईट आहे. मार्क झुकेरबर्ग यांनी ४ फेब्रुवारी २००४ साली आपल्या चार वर्गमित्रांसोबत ही वेबसाईट सुरू केली, तेव्हा त्यांचं वय होतं अवघं एकोणीस वर्षांचं. मित्रांची वयंही कमीअधिक प्रमाणात सारखीच. आज या सगळ्या संस्थापकांची वयं ही ३२ ते ३४ अशी आहेत. फेसबुक या संकेतस्थळाची स्थापना होऊन उणेपुरे एक तप लोटले आहे. या बारा वर्षांत सर्वाधिक

लोकप्रिय सोशल नेटवर्किंग साईट म्हणून फेसबुकने आपले स्थान निर्माण केले आहे. २०१६ सप्टेंबरच्या अहवालानुसार Leading global social network 2016/ statistic, Statista. Retrieved २०१६-१०-२२.संदर्भ विकिपिडीया फेसबुकचे जगभर एक अब्ज, एकहत्तर कोटी, वीस लाख सदस्य आहेत. त्याखालोखाल व्हॉटसअॅप , मेसेंजर, क्यु क्यु, वुईचॅट, क्यु झोन, टुम्बलर, इन्स्टाग्राम, ट्वीटर, स्कायपी अशा इतर सोशल नेटवर्किंग साईट्चा क्रमांक लागतो. स्कायपीचे एकूण युजर आहेत तीस कोटी. यावरून आपल्याला फेसबुकच्या लोकप्रियतेचे आकलन होईल. मायस्पेस, लिंक्ड इन, बेबो, हाय फाईव्ह, हब्बो, क्लासमेट्स, माय इयरबुक, मीट अप, मल्टीप्लाय, नेट्लॉग या इतर काही लोकप्रिय सोशल नेटवर्किंग साईट होत. अमेरिका, दक्षिन अमेरिका, ऑस्ट्रेलिया, भारतीय उपखंडातील देश, युरोप आणि आफ्रिकेतील बहुसंख्य देशात फेसबुकच्या युजर्सची मोठी संख्या आहे. चीन, रशिया आणि काही इस्लाम राष्ट्रात मात्र फेसबुकपेक्षा त्या त्या देशांनी स्वतंत्रपणे निर्माण केलेल्या सोशल नेटवर्किंगला मागणी आहे. थोबाड पुस्तिका, मुखपत्र, मुखपत्रिका, चेहरा पुस्तक असे विविध शब्द फेसबुक या शब्दाला प्रतिशब्द म्हणून आपल्याकडे वापरण्याचे प्रकार झाले, पण रुळला तो फेसबुक हाच शब्द. एक गंमत वा मज्जा म्हणून नवे नवे शब्द तयार झाले आणि लुप्तही झाले.

अलीकडेच (१२ डिसेंबर २०१६) पुणे येथे 'फेसबुक इफेक्ट' या गाजलेल्या पुस्तकाच्या अनुवादाचे प्रकाशन झाले. यावेळी सुप्रसिद्ध स्तंभलेखक आणि कादंबरीकार आशुतोष जावडेकर यांनी फेसबुकच्या अनेक आयामांबद्दल आपली मते मांडली. या कार्यक्रमाचा वृत्तांत प्रकाशित झाला, त्याविषयीची एक पोस्ट जावडेकर यांनी आपल्या फेसबुकवॉलवरती पोस्ट केली आहे (संदर्भः आशुतोष जावडेकर यांची फेसबुक वॉल दिनांक १४ डिसेंबर २०१६ सकाळी १०-०५ वाजता) ते लिहितात, 'बातमीतल्या माझ्या तोंडच्या पहिल्या दोन ओळी मी बोललेलो नाही. आणि एकूण बातमीवरून मी फेसबुकच्या विरुद्ध आहे असं वाटतं, तसंही नाही हे तुम्ही जाणताच.'

कल्बे कबीर हे हिंदीतील एक प्रसिद्ध कवी आहेत. त्यांनी 'फेसबुक फसाना' या शीर्षकाखाली फेसबुकची साधी सोपी व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. ते लिहितात, 'फेसबुक एक रेलगाडी का नाम है. जहां आप अनजान, अजनबी, प्रिय अप्रिय, बडे बुढे, बच्चे स्त्रियां, सबके साथ यात्रा करते है. बीच बीच में चाय गरम और झाल मुडीवाले भी फेरा लगाते रहते है. आपके सहयात्रीयोंमे गुंडे - मवाली, गरीब - अमीर, मूर्ख - विद्वान, जडमति जीनियस सभी तरह के लोग होते है.' ही व्याख्या अनेक अंगांनी खरी आहे. निदान आपल्याकडे तरी जिथे जिओ मोफत मध्ये काही महिने इंटरनेटची सेवा देत आहे आणि शहराशहरात फ्री वायफाय प्लेस तयार होत आहेत, तिथे फेसबुक हे लोकशाहीवादी माध्यम म्हणून पुढे येत आहेत. फेसबुकच्या संदर्भातील विनोद आपण आठवून पाहिले तरी आपल्याला या एका प्लॅटफॉर्मवरती अनेक भेद संपुष्टात आलेले दिसतील.

मराठी लेखक कवींना फेसबुक हे आपल्या अभिव्यक्तीसाठी महत्त्वाचे माध्यम वाटते हे आपल्याला सहज नजर फिरवली तरी लक्षात येईल. रा. रं. बोराडे, बाबा भांड, प्रवीण बांदेकर, हरिश्चंद्र थोरात, वसंत आबाजी डहाके, मंगेश नारायण काळे, सचिन केतकर, हेमंत दिवटे, अरुण शेवते , लक्ष्मीकांत देशमुख, अक्षयकुमार काळे, उत्तम कोळगावकर, श्रीकांत देशमुख, वर्जेश सोलंकी, बालाजी सुतार, वीरा राठोड, ऐश्वर्य पाटेकर, विष्णु थोरे, आबा महाजन, कविता महाजन, प्रल्हाद लुलेकर, प्रज्ञा दया पवार, अरविंद जगताप, संतोष पद्माकर पवार, बाबाराव मुसळे, प्रमोद कोपर्डे, महेंद्र कदम, हेरंब कुलकर्णी, मनोहर जाधव, किशोर सानप, संजय चौधरी, सिसिलिया कार्व्हालो, कल्पना दुधाळ, किशोर पाठक, रमेश वरखेडे, सतीश बडवे, पृथ्वीराज तौर, येशू पाटील, मुकुंद टांकसाळे, नारायण कुलकर्णी कवठेकर, अजय कांडर, विष्णु जोशी, दा. गो. काळे, प्रफुल्ल शिलेदार, गणेश विसपुते, सुनीलकुमार लवटे, बलवंत जेऊरकर, प्रकाश होळकर, आसाराम लोमटे असे सगळे नवे जुने लेखक कवी फेसबुकचा वापर करत असतात. अर्थात ही यादी पुष्कळच लांबवता येईल कारण लिहीत असणाऱ्या बहुतेकांना फेसबुक हे आपल्या अभिव्यक्तीसाठीचे महत्त्वाचे विचारपीठ वाटते.

महाराष्ट्र साहित्य परिषदेसारखी संस्था, बहुतेक वाङ्मयीन मंडळे, साहित्य संमेलने, नियतकालिके, प्रकाशन संस्था फेसबुकवरती आपल्याला सापडतील. फेसबुक हे संवाद प्रस्थापित करण्याचे प्रभावी माध्यम आहे, लेखक, कवींना आपला वाचक हवा असतो त्याचप्रमाणे प्रकाशन संस्थांना व नियतकालिकांना स्वतःचा ग्राहक हवा असतो. वाचकांनाही लेखक-प्रकाशक-संपादक यांच्याशी संवाद साधण्यासाठी याच्याइतके दुसरे चांगले माध्यम सध्यातरी अस्तित्वात नाही.

एकीकडे मराठी पुस्तकांना वाचक राहिलेला नाही अशी

चर्चा होत असते. कविता कुणी वाचत नाही अशी ओरड होताना दिसते. मराठी पुस्तकांच्या आवृत्त्या पाचशे प्रतींपर्यंत खाली आल्या आहेत तर दुसरीकडे फेसबुकवरून मोठ्या प्रमाणात एकमेकांचे विचार, गोष्टी, कविता शेअर करत पुढे पाठवल्या जातात. आपली पोस्ट किती जणांनी पाहिली हे आता कळून येते. एकेका कवितेला जेव्हा हजार पेक्षा जास्त वाचक शेअर करतात. शेयर होणारी विशिष्ट पोस्ट प्रत्येक शेअर मागे किमान पाच हजार व्यक्तींपर्यंत पोचते असे मानले जाते. साहजिकच लक्षात येईल की फेसबुकवरून कविता, कथा, स्वतःचे विशिष्ट मत यांचा प्रसार कसा झपाट्याने होतो. कविता महाजन, अरविंद जगताप, छाया थोरात अशी काही सहज आठवलेली नावे, यांच्या वॉलला भेट दिली तर आपल्याला लक्षात येईल की या व्यक्तींचे फॉलोअर्स कसे झपाट्याने वाढत गेले आहेत. परी पाटील हिच्या वॉलवरतीही वाचकांच्या उड्या पडत असतात. आणि त्यामुळे विविध वर्तमानपत्रात आणि नियतकालिकांत लिहिणारे लेखक आपले लेखन फेसबुकच्या वॉलवरती मुद्दाम उपलब्ध करून देत असतात.

लाईक आणि कॉमेंट ही फेसबुकची महत्त्वाची गोष्ट आहे. विशिष्ट पोष्ट सगळ्यांनाच पटते असे नाही, तिच्याविषयी प्रतिकूल मतेही व्यक्त केली जातात. विविध मत मतांतरांचा गलबला त्यामुळे आपल्याला प्रत्येक पोस्ट्मध्ये वाचायला मिळतो. यातूनच चांगल्या वाङ्मयीन चर्चांना पोषक असे वातावरण फेसबुकच्या माध्यमातून उपलब्ध झाले आहे. महेंद्र कदम, सत्यपालसिंह राजपूत, सचिन केतकर, नरेंद्र लांजेवार, हेरंब कुलकर्णी अशांच्या वॉलवरती अशा चर्चा वाचायला मिळतात. रा. रं. बोराडे हे बारीक शाब्दीक कोट्या करत असतात असे दिसेल. अशा कोट्यांमधून ते त्यांचे सामाजिक, राजकीय, वाङ्मयीन मतच नोंदवत असतात.

मी (विद्या सुर्वे बोरसे) स्वतः फेसबुकवरती महिनाभर दैनिक स्तंभ लिहीला आणि त्यातून 'बालसाहित्य : आकलन आणि आस्वाद' हे माझे पुस्तक नंतरच्या काळात तयार झाले. तात्काळ प्रतिक्रियांमुळे स्वतःला तपासण्याची व दुरुस्त करण्याची संधी फेसबुक उपलब्ध करून देते. बर्टोल्ट ब्रेख्त यांच्या कवितांचे मी केलेले अनुवाद वाचकांमुळे सर्वदूर पोचले. बालाजी सुतार यांच्या फेसबुकवॉलवरील लेखनातून आगामी काळात वाचनीय पुस्तक हाती येईल असे वाटते.

फेसबुक मुळे नवी भाषा, नवे शब्दप्रयोग, नवी संक्षिप्त रूपे आकाराला आली आहेत. 'कॉमेंटले', 'लाईकले' हे शब्द केवळ फेसबुकमुळेच तयार झाले आहेत. फारुख काझी यांनी मध्यंतरी अशा शब्दांविषयी लिहिले आहे.

फेसबुकच्या भिंतीला दोन बाजू आहेत. एका बाजूला आपले मित्र किंवा आपण ज्यांचा पाठलाग करत आहोत (अर्थात आपण ज्यांना फॉलो करत आहोत) त्यांनी लिहिलेला मजकूर दृश्य होत असतो. आपल्या मित्रांच्या संख्येवरती या मजकुराची गती ठरते. भिंतीच्या दुसऱ्या बाजुला आपण लिहिलेला, शेअर केलेला मजकूर पाहता येतो. आपल्याला कुणी जर काही डकवले (म्हणजे टॅग केले) असेल तर असाही मजकूर या बाजूला दिसतो. या पानांच्या अगदी वरच्या बाजूला तुम्हाला मित्रांनी पाठवलेली विनंती (फ्रेंड रिक्वेस्ट), संदेश (चॅट विंडो) आणि आपल्या मजकुराविषयीच्या सूचना (नोटिफिकेशन्स) आपल्याला कळत राहतात.

'होम' (मुखपृष्ठ) नावाच्या पानाचे विभाजन वेगवेगळ्या कप्प्यांमध्ये केलेले असते. आपण ज्या गटांचे अथवा समूहांचे सदस्य आहोत, त्यांच्याविषयीचा मजकूर, आगामी काळातील आपले कार्यक्रम, मित्रांचे वाढदिवस, आपण सेव्ह केलेला मजकूर, खेळ, फोटो, अशी विविध माहिती. या पृष्ठावर असते. आपल्यासाठी काही सजेशन्सही या पानावर असतात. विशिष्ट पेज, ग्रुप यांच्या संदर्भाने ही सजेशन्स युजर्सला पाठवली जात असतात. मेसेंजरच्या सुविधेमुळे कोण कोण सध्या फेसबुकचा वापर करत आहे (कोण ऑनलाईन आहे) हे कळून येते, संवाद साधण्यासाठी उजव्या बाजूचा हा स्तंभ उपयोगी येतो.

फेसबुकच्या पानांची एकूण रचना ही सुटसुटीत आणि आकलनसुलभ आहे. अलीकडे मजकूर आपल्याला विविध रंगात व विविध रंगी पृष्ठभागावरतीही लिहिता येण्याची सोय झाली आहे. मेसेंजर आणि अन्य कारणांमुळे संवाद माध्यम म्हणुन फेसबुक अधिक सोईचे झाले आहे.

साहित्य हा संवादाचा व्यवहार आहे. या हृदयींचे त्या हृदयाशी हा संवाद असतो. फेसबुकचे विद्यमान रूप संवादाला पुरक आहे. पोषक आहे. मराठी साहित्याच्या नव्या शक्यता या नव्या संवादातून हाती येतील अशी शक्यता आहे.

◆

**प्रा. विद्या सुर्वे बोरसे**
चलभाष : ९४०५५४७००२

(प्रा विद्या सुर्वे बोरसे, मराठी विभाग, महाराजा सयाजीराव गायकवाड महाविद्यालय, मालेगाव (कँप) जिल्हा नाशिक)



अनुक्रमणिका



लेख

राजीव जोशी

# देवासचे राजकवी गोविंद झोकरकर

कवितेच्या पुस्तकांची विक्री होत नाही, तिला मंदी आहे अशा घोषणा प्रकाशकांकडून होत आहेत. वधू परीक्षेला उभ्या राहिलेल्या उपवर मुलीतील काल्पनिक दोष दाखवणाऱ्या तरुण मनोवृत्तीप्रमाणे आधुनिक कवितेला नाके मुरडणाऱ्या टीकाकारांनी एक नवी आघाडीच उघडली आहे. त्यांच्या सरबत्तीतील काही बॉम्बगोळे पहा : मराठीत महाकाव्ये निर्माण होत नाहीत, मराठी कवी स्वप्नाळू व प्रेमवेडे आहेत, देशात आग लागली आहे, बंगाल उपाशी मरत आहे आणि मराठी कवी झोप घेत आहेत, आधुनिक कवींची प्रतिभा कोणती आहे, अलीकडील कविता अ-प्रासादिक व लालित्यशून्य आहे.. हे काही कुणी आज काढलेले उद्‌गार नाहीत तर पंचाहत्तर वर्षांपूर्वी जानेवारी १९४४मध्ये इंदूर ख्रिश्चन कॉलेज येथील तरुण महाराष्ट्र मंडळाच्या बाविसाव्या वार्षिकोत्सव प्रसंगी झालेल्या कविसंमेलनाच्या प्रास्ताविक भाषणात राजकवी गोविंद झोकरकरांचे मराठी कवितेबाबतचे विचार आहेत. नोव्हेंबर १९५१ मध्ये पाचव्या मध्यभारत मराठी साहित्य संमेलनात कवि संमेलनाच्या अध्यक्षपदावरून कविता लेखनाच्या पाच पायऱ्या सांगितल्या, कवितेची व्याख्या सांगितली, माळव्यातल्या कवींचा कालिदासापासून आपले गुरू भा.रा.तांबे, शरदच्चंद्र मुक्तिबोध पासून आढावा घेतला, बृहन्महाराष्ट्रातल्या मराठी साहित्यिकांच्या व्यथा मांडल्या आणि सर्वात शेवटी नवकाव्याचे प्रवर्तक बा. सी. मर्ढेकर यांनी रूढ केलेल्या कवितेतील नव्या प्रवाहाचा समाचार घेताना म्हणाले, नवकाव्य नावाची जी वस्तू काव्याच्या बाजारपेठेत अलीकडे वैपुल्याने खपत आहे ती सकस नसून काव्यप्रकृतीला विघातक आहे हे नि:संकोचपणे, नव्या मित्रांचा रोष पत्करूनही मी येथे स्पष्ट जाहीर करू इच्छितो. ते पुढे मर्ढेकरांविषयी म्हणतात, नवकाव्याचे प्रवर्तक बा. सी. मर्ढेकर हे स्वत: एक उत्कृष्ट कवी आहेत हे त्यांच्या शिशिरागम काव्याने मागेच सिद्ध केले आहे. पण त्यांनी केवळ गंमत म्हणून प्रचलित केलेला हा प्रकार रूढ होऊ पाहत आहे, हे अनिष्ट आहे. असं म्हणून त्यांनी कवींना आग्रहाची सूचना केली की या संप्रदायाकडे वळू नका आणि परस्पर वसंत हसबनीसांच्या वश्या म्हणे या संग्रहातील कवितांवर टिप्पणीही केली. या संपूर्ण संमेलनाचे अध्यक्ष होते लोकसत्ताकर ह. रा. महाजनी.

मराठी कविता मर्ढेकरांचा प्रभाव पार करून कधीच पुढे गेलेली आहे. बापट-पाडगावकर-करंदीकर ते अगदी ग्रेस, नामदेव ढसाळ, दि. पु. चित्रे, अरुण कोलटकर आदी मर्ढेकरोत्तर मराठी कवितेवर प्रभाव टाकणारे कवीही अस्तंगत झालेले आहेत. मराठी कविता ग्लोबलायझेशनमुळे वैश्विक होत चाललीय. अशा वेळी पाऊणशे वर्षांपूर्वी मर्ढेकरांचा जाहीर समाचार घेणारे गोविंद झोकरकर कोण, असा प्रश्न (कोण सबनीस, कोण अक्षयकुमार काळे या चालीवर) आमच्या कवी आणि रसिकांना पडणं शक्य आहे. आणि म्हणूनच राजकवी गोविंद झोकरकर यांचा काळ, जीवन आणि कविता एक अभ्यासक, रसिक म्हणून समजून घेणे आवश्यक आहे.

मला झोकरकरांची कविता पाहाविशी, वाचाविशी वाटली याला कारण ज्येष्ठ कवी प्रा. शंकर वैद्य होत. झोकरकरांचे धाकटे बंधू पुरुषोत्तम झोकरकर त्या वेळी कल्याणात रहात होते आणि एका सामाजिक संस्थेत आम्ही सहकारी होतो. एका कार्यक्रमाच्या निमित्ताने वैद्य सर आले असता त्यांनी राजकवी झोकरकरांच्या नात्याविषयी विचारलं. राजकवी थोरले बंधू आहे हे कळल्यावर आनंद तर झालाच त्यांनी मधुघटाला उत्तर, सारंगी वाजते, माधव ज्युलियनांवरची कविता, नियती, कोजागिरी या आणि अशा अनेक कविता तोंडपाठ म्हणून दाखवल्या, त्यांनी लिहिलेल्या गझला, कणिका याबाबतही भरभरून बोलले. मला झोकरकरांच्या कविता वाचण्याची उत्सुकता तेथून निर्माण झाली.. राजकवींच्या कविता उपलब्ध करून देण्यासाठी झोकरकरांच्या मागे लागलो. त्या वेळी निवडक झोकरकर हे १९८५ साली प्रसिद्ध झालेलं छोटेखानी पुस्तक



अनुक्रमणिका








■■

**मराठी कविता ग्लोबलायझेशनमुळे वैश्विक होत चाललीय. अशा वेळी पाऊणशे वर्षांपूर्वी मर्ढेकरांचा जाहीर समाचार घेणारे गोविंद झोकरकर कोण असा प्रश्न (कोण सबनीस, कोण अक्षयकुमार काळे या चालीवर) आमच्या कवी आणि रसिकांना पडणं शक्य आहे. आणि म्हणूनच राजकवी गोविंद झोकरकर यांचा काळ, जीवन आणि कविता एक अभ्यासक, रसिक म्हणून समजून घेणे आवश्यक आहे.**

■■



त्यांनी मला दिलं. पण ते झोकरकर व्यक्ती आणि काव्य समजायला पुरेसं नव्हतं. त्यानंतर अनेक भेटीत वैद्य सर राजकवींवर बोलायचे, कविता सांगायचे असा सिलसिला चालूच राहिला.

राजकवी चंद्रशेखर, राजकवी भा.रा.तांबे, राजकवी यशवंत, राजकवी काळेले यांच्या परंपरेतला शेवटचा राजकवी म्हणजे गोविंद लक्ष्मण झोकरकर. त्यांचे पूर्वज पेंढापूर-तुळजापूर येथून १९५७च्या पूर्वी शिंदेशाहीतील झोकर या गावी वास्तव्याला गेले आणि तिकडेच स्थाईक झाले. झोकरकरांचा जन्म २१ ऑगस्ट १९१२ रोजी देवास येथे झाला. त्यांचं शिक्षण अजमेर बोर्डाचे मॅट्रिक्युलेशनपर्यंत. घरची गरिबी असल्यामुळे त्यांनी आपले पुढील सर्व शिक्षण स्वावलंबनाने केले. १९३६ मध्ये देवासच्या मराठी शाळेत हेडमास्तर म्हणून कामास प्रारंभ केला व नंतर देवास राजपरिवाराचे रॉयल ट्युटर म्हणून काम पाहू लागले. १९४६ मध्ये देवास संस्थानचे राजकवी म्हणून त्यांना सन्मानित करण्यात आलं. संस्थानाच्या विलिनीकरणानंतर देवास संस्थाच्या प्रिंटींग प्रेस आणि स्टेशनरीचे सुपरिटेंडेंट म्हणून काम पाहू लागले. याशिवाय इंग्रजी व मराठी विषयात महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना अध्यापन आणि मार्गदर्शन केले.

प्रथम रविकिरण मंडळ आणि नंतर कविवर्य भा.रा.तांबे यांच्या कविता आणि काव्यविषयक तत्त्वज्ञानाने प्रभावित झालेल्या राजकवी गोविंदराव झोकरकर यांना विद्यार्थी दशेपासून कविता लिहिण्याचा छंद होता. त्यांच्या कविता त्या वेळच्या यशवंत, पारिजात, किर्लोस्कर, प्रतिभा, ज्योत्स्ना, कला, सुषमा, अभिरुची, हंस, ध्रुव, सह्याद्री, आनंद, मनोरंजन, वाङ्मयशोभा, वसंत, क्षितिज, रत्नाकर अशा विविध मासिकातून प्रसिद्ध झालेल्या आहेत. 'काव्यकणिका' (१९४२) व 'टेकडीच्या पायथ्याशी' (१९५१) या त्यांच्या दोन संग्रहात कविता समाविष्ट आहेत. १९८२ मध्ये त्यांच्या निवडक कवितांचा संग्रहही प्रकाशित झाला आहे. याशिवाय 'स्मृतिकुंज' या कै. हर्णेचरित्र व काव्य या ग्रंथाचे (१९४४) तसेच स्वातंत्र्य या मध्य भारतीय मराठी हिंदी मासिकाचे संपादनही (१९४७) त्यांनी केले आहे.

आंग्ल भाषेचा आणि कवितांचा त्यांचा दांडगा व्यासंग होता. विख्यात इंग्रजी लेखक ई.एम.फॉस्टर यांनी ऐन दुसऱ्या महायुद्धाच्या धुमाळीत झोकरकरांना 'ए पॅसेज टू इंडिया'च्या भाषांतराला परवानगी दिली होती. डब्ल्यू.एस. लँडोर हा झोकरकरांचा आवडता इंग्रजी कवी होता. त्यांच्या एका इंग्रजी कवितेच्या अनुवादात ते म्हणतात : वैर न मी कधिं केले, योग्य न वैरास कुणी । नैसर्गी मम प्रीती; आणि कलेवर भक्ती ।। जीवन शेकोटीवर, शेकियले कर दोही । विझते ती; आणि पहा, जाण्या मी सज्ज दूरी ।। हैद्रावादमध्ये गाडगीळ नावाचे एक रसिक होते. त्यांनी झोकरकरांना पत्र पाठवून सांगितलं होते की तांब्यांच्या मधुघटाला उत्तर देणाऱ्या कवीची योग्यता मी फार मानतो. हे आव्हान झोकरकरांनी स्वीकारले आणि रिकामे मधुघटला उत्तर देणारी कविता लिहिली. गंमत म्हणजे हिंदी साहित्यिक मुन्शी प्रेमचंद यांनी त्या कवितेचं हिंदी भाषांतर करून आपल्या हंस मासिकात छापलं. प्रकाशक हरिभाऊ मोटे यांनी तांब्यांची आणि झोकरकरांची रिकामे मधुघट ही कविता एकाच पानावर जवळ जवळ प्रसिध्द केली. ही गोष्ट डिसेंबर १९३५ची. तांबे म्हणतात 'मधु मागशी माझ्या सख्या, परि । मधुघटचि रिकामे पडती घरी'; तर झोकरकर म्हणतात का 'म्हणसि रिकामे घट सगळे । का मधुहि त्यात मजला न मिळे'. कवी झोकरकरांची आणखीन एक गाजलेली कविता म्हणजे 'सारंगी वाजते'. या कवितेमध्ये झोकरकरांची सामाजिकदृष्टी आणि समाजाविषयी कणव दिसून येते. ही कविता झोकरकरांनी १९३०-३१ मध्ये म्हणजे वयाच्या केवळ १८-१९व्या वर्षी लिहिली आणि

तीही बाळ झोकरकर या नावाने. वाळकी भाकर पाण्यासवे खाणारी, थंडीत कापणारी आणि देवीच्या रोगाला बळी पडणारी मजुरांची मुले, त्यांची तळमळणारी आई आणि दुसरीकडे होमात तुपाची धार सोडणाऱ्या, हवेलीतल्या बिछान्यांवर आपल्या कुत्र्यांना झोपवणाऱ्या, मालकाला रिझवण्याला सारंगी वाजवणाऱ्या वर्गाचं मनस्वी चित्रण या कवितेत आहे. यावर प्रो. वि.पां. दांडेकरांनी झोकरकरांना सांगितलं की पुरोगामी साहित्याचा मनोज्ञ नमुना दाखवायचा झाल्यास मी तुमच्या कवितेकडे बोट दाखवीन. ही कविता प्रसिद्ध झाल्यावर कवी झोकरकरांचा साम्यवादाकडे कल किंवा संस्कार तर झाले नसावेत? असा वस्तुत: कुठल्याच वादात न अडकणाऱ्या आणि कुठल्याच वादाच्या अथवा झेंड्याच्या पताका खांद्यावर न घेणाऱ्या देवासकर झोकरकरांनी संस्थानात राहून अशी सामाजिक व पुरोगामी विचारांची कविता लिहावी याचं महत्त्वाचं कारण त्यांच्या ठायी सतत वास करत राहणारी करुणा, कणव हे होय. 'मालविका' या मध्यभारतीय कवींच्या प्रातिनिधिक कविता संग्रहाला लिहिलेल्या प्रस्तावनेत (कविवर्य तांबे साहित्य विचार पृ.१६६-६७ संपादक : वा.रा.ढवळे, रा.अ.काळेले) सारंगी वाजते या कवितेविषयी लिहिलंय. करुण रसाच्या क्षेत्रातदेखील प्रस्तुत संग्रहात हृदय पिळून टाकणारी कवणे आहेत. गरिबांचे दैन्य व भांडवलशाहीची त्याविषयी बेपर्वाई या विषमतेची हृदयद्रावक दृश्ये सारंगी वाजते या गीतात चितारली आहेत.

राजकवी समजून घ्यायला आधी देवासविषयी लिहिणं आवश्यक आहे. क्षिप्रा नदीचं सान्निध्य असलेलं देवास टेकडीच्या पायथ्याशी वसलेलं आहे. टेकडीवर पहारा देणाऱ्या चामुंडा देवीच्या पावलांवरून वाहत येणारा शुद्ध वारा देवासला पावित्र्य व ताजेपणा देणारा आहे. याच नैसर्गिक ताजेपणाने देवासला, देवासला वास करणाऱ्या कलाकारांना, मग ते उस्ताद रजबअली खानसाहेब असो, पंडित कुमार गंधर्व असो, मामासाहेब मुजुमदार यांसारखी संगीत क्षेत्रातली मंडळी असो वा राजकवी भा.रा.तांबे वा राजकवी झोकरकर असो यांना फुलवलं. मराठी भाषेला समृद्ध केलं. माळव्यातल्या लोकांना आपली मराठी मूळ माळवामिश्रित नाही याचा सार्थ अभिमान होता.. राजकवी झोकरकर माळव्याबद्दल भरभरून बोलताना लिहितात : माळव्याची गोड हवा, धरली त्याली साज नवा, उंच मिळाला भाव गव्हा, शेतकऱ्यांचा निघे थवा, बैलगाडीचा रंग निळा असं म्हणताना माळव्याच्या वैभवावर निळ्या आभाळाची छत्रछाया असल्याचंही सूचित करतात. देवासच्या प्रत्येक पैलूवर राजकवीने विलक्षण ममत्वाने, वात्सल्याने लिहिलंय. माळव्यातल्या वादळात सापडलेल्या एका गुराखिणीचं अतिशय रसरशीत वर्णन करताना राजकवी लिहून जातात की डोईस दुधाची चरवी आणिक लोणी, वादळी सापडे गुराखीण वाराणी. तिच्या सौंदर्याचं वर्णन करताना राजकवी म्हणतात की ती गव्हाळ कांती नेत्र सशाचे डोळे, नाचती कपोली केसही काळे काळे । फडफडे ओढणी पिवळी, कुंकुम भाळी, ही मौज बघाया जमे ढगांची टोळी. राजकवीनी एका गुराखिणीला आपल्या काव्याचा विषयच बनवलं नाही तर शब्दातून तिचं सौंदर्य, तारुण्य, भोवतालचं वादळ अक्षरश: डोळ्यांसमोर उभं केलंय: नसनसी साठली तिच्या नवी मधुज्वानी कोसळे वरोनी धो धो धो धो पाणी, दातात तिच्या हुडहुडी, मुखावर लाली, वृक्षावर हलते, जास्वंदाची जाळी । मेघातून कोणी तिजला गारा हाणी, तुडवीत चालली पायी ओहळ पाणी. वादळात सापडली असली तरी तिच्या हृदयात गुंजणाऱ्या प्रीतीला साथ आहे ती वाहणाऱ्या वाऱ्याची.

दुसऱ्या महायुद्धाच्या सैन्यात गेलेल्या आपल्या पतीच्या विरहाने एका पत्नीचा विलाप करुणारती या कवितेत राजकवी असा काही शब्दबद्ध करतात की तो कोणत्याही काळात लढणाऱ्या सैनिकाच्या पत्नीच्या भावना वाटाव्यात. होई तुझ्या शिरी का राया विमान मारा, वार्ता तुझी न येई, साहे न कोंडमारा. राजकवी देशाच्या स्वातंत्र्य चळवळीचे साक्षीदार होते. देशात कोणतीही चांगली वा वाईट घटना घडत असतात, त्यांचं तात्कालिकत्व काळाच्या ओघात विरून जात असलं तरी जनमानसावर अदृश्य पडसाद उमटतच असतात आणि हे परिणाम दर्शवणारं एकमेव मोजमापक साहित्य व कविता होय. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर महात्मा गांधींची हत्या झाली. राजकवींवरही त्याचा परिणाम झाला. महात्म्याचे मरण या कवितेत ते म्हणतात येशु नि बुद्धसम असे जगी जो वंद्य, त्या महात्म्यास मारणे किती हे निंद्य, तो हासत जगला, हासत मेला अंती, मरणाने झाला अमर महात्मा अंती.

माळवा म्हणजे कविकुलगुरू कालिदासाची भूमी. या भागातल्या इंदूर, देवास, महु, धार, उज्जैन, खांडवा, भोपाळ, ग्वाल्हेर, बऱ्हाणपूर, बिलासपूर, रायपूर, जबलपूर आदि भागातल्या मराठी राजवटीपासून असणाऱ्या मराठी माणसांनी तिथे मराठी जोपासली नव्हे तर आजही मराठी त्यांचा श्वास आहे. भा. रा. तांबे आणि राजकवी झोकरकरांबरोबरच भवानीशंकर, श्रीधर पंडित, निर्मला देशपांडे, शरदच्चंद्र मुक्तिबोध, प्रभाकर माचवे, राजकवी



अनुक्रमणिका

काळेले, रहाळकर, के.ना.डांगे असे अनेक दिग्गज माळव्याने महाराष्ट्राला दिले आणि त्यातला आद्य कवी म्हणजे राजकवी झोकरकर. देवासबद्दल आकर्षण वाटण्याचं कारण म्हणजे कुमार गंधर्व आणि राजकवी झोकरकर. एकाच्या दारी पारिजातक तर दुसऱ्याच्या दारी शब्दांची वेल. या काळात पुरोगामी पाऊलखुणा पडायला सुरुवात झाली त्या काळात सारंगी वाजते या सारख्या कवितेतून पुरोगामित्वाचा झेंडा आपल्या खांद्यावर घेणारा राजकवी म्हणजे गोविंदराव झोकरकर. टेकडी आणि उंचावरचे देऊळ असलेल्या देवासमध्ये राजकवींनी आपले सारे आयुष्य घालवले, महाराष्ट्रातल्या अनेक कवींच्या कवितांचे वाचन केले. जपानी हायकूचे वाचन केल्यावर माळव्याच्या माळरानावर आपल्या कवितांचा इकेबाना मारला. विख्यात इंग्रजी लेखक ई.एम. फॉस्टरच्या रोड टू पॅसेजचा अनुवाद मृत्यूपूर्वी पूर्ण केला. संस्थान विसर्जित झालं, उपाधीचं माहात्म्यं संपलं तरी पन्नास वर्षे प्राणपणाने सांभाळली ती निर्मेळ कविता.

११ आणि १२ मार्च १९९५ रोजी उज्जैनला पाचव्या प्रांतिक मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी राजकवींची एकमताने निवड झाली होती. परंतु १२ मार्च रोजीच राजकवींचं इंदूर येथे निधन झाले. या संमेलनासाठी ज्येष्ठ कवी आणि अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष नारायण सुर्वे उपस्थित होते, संमेलनाच्या अध्यक्षांचं भाषण कार्याध्यक्षांनी वाचून दाखवले. त्याच वेळी प्रसृत करण्यासाठी आधी ध्वनिमुद्रित केलेली राजकवींची मुलाखत नभोवाणीवर सुरू झाली. सुर्वे म्हणाले, राजकवींना प्रथमच भेटणार होतो, साहित्य संमेलनात गळ्यात पडणारा हार पार्थिवावर पडावा याचं वैषम्य त्यांनी शोकसभेत बोलूनही दाखवलं. राजकवींना मृत्यूची चाहूल लागली असावी, उज्जैन संमेलनासाठी राजकवींनी जे भाषण तयार केले होते त्यात शेवटी ते म्हणतात:

येऊ नये पण जर का आले अकाली मरण मला
प्रिय सुहृदांनो, मम आप्तांनो करू नका गलबला
वसा शांतसे डोळे लावूनी स्तब्ध जरा
आणि बोलवा, मन्नुखाँला सारंगी घेऊनी सांगा
छेडावया विलंबित लयीची मधुरागिणी..

◆

राजीव जोशी
सोबत, अ-८, उषादर्शन सोसायटी
आग्रा रोड, कल्याण ४२१३०१
दूरध्वनी : ९५९४०७४४५३
ई-मेल : joshrajiv@gmail.com



पुस्तक परीक्षण

डॉ. नागनाथ कोतापल्ले

# 'जू' : मराठी साहित्य समृद्ध करणारं आत्मकथन

ऐश्वर्य पाटेकर हे आजच्या तरुण पिढीतले महत्त्वाचे कवी. त्यांना साहित्य अकादमीचाही युवा पुरस्कार प्राप्त झाला आहे, तो त्यांच्या आगळ्यावेगळ्या आणि सच्च्या कवितेमुळे, गुणवत्तेमुळे. खेड्याची माती ज्याच्या अंगभर भिनली आहे, असा कवी म्हणजे ऐश्वर्य पाटेकर. हेच पाटेकर आता 'जू' हे आत्मकथन आपल्यासमोर घेऊन आले आहेत. हे आत्मकथनही अनेक अर्थानं वेगळं आहे. साधारणतः - आत्मकथनांमध्ये थोडीबहुत निर्मिती असतेच, किंबहुना जो जगलेला भाग असतो, त्याची पुनर्निर्मिती लेखकाला करावी लागते. परंतु या आत्मकथनामध्ये मात्र जी पुनर्निर्मिती झालेली आहे, ती ललित लेखकाच्या अंगानं, कवीच्या अंगानं झाली आहे. त्यामुळे प्रतिमा-प्रतीकांच्या भाषेतच लेखक इथं बोलतोय. त्यामुळे संपूर्ण आत्मकथनाला एक काव्यात्मकतेचा पदर प्राप्त होत जातो. या काव्यात्मकतेमुळे हे आत्मकथन अधिक प्रभावी आणि वास्तवदर्शीही होत जातं. लासलगाव-चांदवड परिसरातील ग्रामीण बोली हे या आत्मकथनाचं आणखी एक वैशिष्ट्य आहे. या बोलीतले वेगळे शब्द, वाक्प्रचार आणि म्हणींमुळे प्रत्ययकारितेमध्ये वाढच होत जाते. पाटेकर यांच्या व्यक्तिमत्त्वावर लोकसाहित्याचे संस्कार आहेत. त्यामुळे अनेक लोकगीतांचे संदर्भ तर येतातच, पण त्यांची संपूर्ण शैलीही लोकसाहित्यानं प्रभावित झाली आहे. त्यामुळे छोटी-छोटी वाक्ये, वाक्यांशाची-शब्दांची पुनरावृत्ती, पुष्कळ ठिकाणी गीताच्या जवळ जाणारी रचना, यामुळे या आत्मकथनाची वाचनीयता वाढत जाते आणि त्याचवेळी परिस्थितीच्या 'जू'ने पिचून गेलेल्या जीवनाची वेदना वाचकांना अस्वस्थ करते. मराठी साहित्यविश्वाला समृद्ध करणारं हे एक ग्रामीण आत्मकथन म्हणूनच महत्त्वाचं आहे.




हे पाटेकर यांचं आत्मकथन आहे, असं म्हणून भागणार नाही. त्यांच्या आईनं विपरीत परिस्थितीशी जी झुंज दिली, त्या झुंजीची ही संघर्ष गाथा आहे. या आत्मकथनाचा केंद्रबिंदू पाटेकर यांची आईच आहे. दुसरं केंद्र म्हणजे दारिद्र्याच्या, दुःखाच्या छायेमध्ये वाढत जाणारं, आपलं कवीपण फुलवणारं ऐश्वर्य पाटेकर हे मूल आहे. अर्थात, या दोघांभोवतीचं सारं जग इथं येतंच. किंबहुना, या जगानंच त्यांच्या वाट्याला दुःखाचे दशावतार आणले आहेत. ऐश्वर्यच्या वडिलांनी दुसरं लग्न केलं, यामध्ये त्यांची आई, बहीण, मेव्हणा, मुंबईचा बुट्टा भाऊ असे सगळे सामील आहेत. दुसरं लग्न का, तर या पहिल्या बायकोला म्हणजे ऐश्वर्यच्या आईला साऱ्या मुलीच होतात म्हणून आणि ती शोभत नाही म्हणून. खरं म्हणजे ऐश्वर्यच्या वडिलांचं म्हणजे नामदेवचं शिक्षण त्याच्या सासरच्या लोकांनी केलेलं. जावई शिकला तर आपली लेक सुखात राहील, ही भावना त्यामागं होती; परंतु झालं उलटंच. शिकत असतानाच त्यानं दुसरी बाई पाहून ठेवलेली. नंतर घरच्या लोकांनीही त्याला साथ दिली आणि त्याचं दुसरं लग्न झालं आणि येथूनच ऐश्वर्यच्या आईच्या दुःखाचा प्रारंभ होतो. तिला हाकलून द्यायचा चंगच सासरच्या मंडळींनी बांधलेला असतो. ती माहेरी जावी म्हणून तिच्यावर अनेकदा हल्ले करतात. लहान-लहान चार मुली आणि पोटात मूल अशा परिस्थितीत ही बाई काय करणार? प्रारंभी ती माहेरी जाते, तर भावजयीनं अक्षरशः हकलून दिलं. मग पुन्हा ती सासरी पाटेगावला येते. तिथंच ठाण मांडून राहते.





अनुक्रमणिका

■

**हे पाटेकर यांचं आत्मकथन आहे, असं म्हणून भागणार नाही. त्यांच्या आईनं विपरीत परिस्थितीशी जी झुंज दिली, त्या झुंजीची ही संघर्ष गाथा आहे. या आत्मकथनाचा केंद्रबिंदू पाटेकर यांची आईच आहे. दुसरं केंद्र म्हणजे दारिद्र्याच्या, दुःखाच्या छायेमध्ये वाढत जाणारं, आपलं कवीपण फुलवणारं ऐश्वर्य पाटेकर हे मूल आहे. अर्थात, या दोघांभोवतीचं सारं जग इथं येतंच. किंबहुना, या जगानंच त्यांच्या वाट्याला दुःखाचे दशावतार आणले आहेत.**

■



आपल्या मुलींच्या मदतीनं स्वतः घर बांधते. मोलमजुरी करून आपल्या मुलांना वाढवीत राहते. तिकडे वणीमध्ये तिचा नवरा दुसऱ्या बाईबरोबर संसार थाटतो. आपल्या पहिल्या बायकोला आणि मुलींना उघड्या आकाशाखाली सोडून देतो. परंतु ही जिद्दीची बाई न डगमगता मोलमजुरी करून, स्वतःच्या चार बिघे शेतात राबून मुलांना वाढवीत राहते. परंतु तिच्या सासूला, नवऱ्याला, नणंदेला आणि तिच्या नवऱ्याला या बाईला गावातच राहू द्यायचं नसतं. तिला सहकार्य करणं तर सोडाच, परंतु धमकावणं, मारहाण करणं, घर पाडून टाकणं, पोलिस केस करणं असले उपद्व्याप ही मंडळी सतत करतात. तिला जीव नकोसा करून सोडतात. अशा अवस्थेत आपल्या चार मुली आणि एक मुलगा यांना पोटाशी धरून तिथंच जिद्दीनं ती संघर्ष करत राहते. पोटगीचा दावाही लावते आणि जिंकते. ऐश्वर्यचा बाप म्हणजे नामदेव हा माणूस कमालीचा स्वार्थी, क्रूर आणि उलट्या काळजाचा आहे. मुलींच्या लग्नांमध्येच अडचणी आणण्याचा तो प्रयत्न करतो. त्याची दुसरी बायको छोट्या ऐश्वर्यला जिवे मारण्याचा प्रयत्न करते, आजी आणि इतर मंडळी मुलींचा छळ करतात, तर तो दुसऱ्या बायकोच्या आणि आईच्या बाजूनंच उभा राहतो. त्याला आपल्या मुलींबद्दल थोडंही प्रेम वाटत नाही. असा बाप, असा माणूस ज्यांच्या वाट्याला आला, त्यांच्या आयुष्याची धुळवड होणारच! ही धुळवड ऐश्वर्यच्या वाट्याला आली. त्याची आई तर या सर्व दुःखावर मात करणारी महानायिकाच वाटते.

या आत्मकथनाचा एक पदर आहे तो ही सारी मुलं वाढण्याचा. त्यांचं बालपण, बालपणातले हट्ट, त्यांची भूक आणि उपासमार, उपासमारीतून सुटण्यासाठीचे प्रयत्न. कधी चिंचेचा पाला खाऊन राहा, कधी गिरणीतील पीठ चोरून आण असेही प्रकार होत राहतात. अशा सगळ्या विपरीत परिस्थितीत वाढत जाणारी मुलं इथं फार चांगल्या रीतीनं चित्रित झाली आहेत. वाढत्या वयानुसार त्यांची समज कशी वाढत जाते, याचं चित्रणही पाटेकर यांची मानवी जीवनासंबंधीची जाण व्यक्त करतं.

या आत्मकथनात ऐश्वर्यचं वाढणं, त्याचे मित्र, त्याची शाळा, बापाचं नसणं, त्यातून निर्माण झालेले ताणतणाव हे सारं तर प्रकट होत जातंच. पण मुख्य म्हणजे त्याची जगावेगळी संवेदनशीलता प्रकट होत जाते. कवी म्हणून त्याचा कसा विकास होत जातो, हेही कळतं. चौथीत असतानाच त्यानं कविता लिहिली, परंतु त्याच्या शिक्षकांना वाटतं, की त्यानं ती चोरली आहे. त्यातून त्याला मित्र चिडवतातही; परंतु त्याचं कविता लिहिणं थांबत नाही. कारण त्याला कवित्व मुळी जन्मतःच प्राप्त झालेलं आहे. तो दारिद्र्य आणि दुःखावर मात करीत सतत कविता लिहीत राहतो. वाचत राहतो. शेवटी देवळ्याच्या शाळेत त्याच्यातल्या कवीचा सन्मान होतो. त्याला त्याच्या स्वत्वाची जाणीव होते. स्वतःची ओळख पटते. त्या बळावर तो ताठ उभा राहतो. एक प्रकारे इथं संकटावर मात करीत जाणारा किशोर जसा प्रकट होतो, त्याप्रमाणे त्याच्या बालपणातून तो किशोरावस्थेकडे कसा जातो, याचेही उत्तम आरेखन झालं आहे. त्याबरोबरच एका कवीचा विकासही चित्रित झाला आहे. ग्रामीण जीवन, त्यातले ताणतणाव, नातेसंबंध, त्यातला पीळ सांगणारं हे आत्मकथन माणसाच्या अभंग जिद्दीची कथा आहे. परिस्थितीचा 'जू' मानेवरती असतोच, गाडा ओढावा लागतोच, पण त्यावरही मात करून उभं राहता येतं, अशी प्रेरणा देणारी हे आत्मकथन म्हणजे मराठीतली एक अजोड कलाकृती आहे.

◆

डॉ. नागनाथ कोतापल्ले, पुणे








अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

प्रा. डॉ .श्रीराम गडकर

# गरुडभरारी... एका जिप्सीची!

■ ■

**या पुस्तकात बालपण, महाविद्यालयीन विश्व, स्पर्धा परीक्षा आणि भरारी, आगळावेगळा अधिकारी, देश-विदेश, कविता आणि फोटोग्राफी, लेखकाचा प्रवास, जगन्मित्र काय म्हणतात?, आज... या प्रकरणांच्या माध्यमातून चरित्रनायकाच्या जीवनाचा वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. देश, परदेशातील, कार्यालयातील, गावाकडील, आई, वडील, नातेवाईक, शिक्षक, मित्र इत्यादींच्या छायाचित्रांच्या समावेशाने चरित्र अधिक बोलकं केलं आहे.**

■ ■



- पासपोर्ट मॅन ऑफ इंडिया : डॉ. ज्ञानेश्वर मुळे
- लेखिका-दीपा देशमुख
- प्रकाशक - मनोविकास प्रकाशन
- पृष्ठे- ६०
- मूल्य- रु. ७०/-

दीपा देशमुख यांनी किशोरवयीन मुलांसाठी 'तुमचे-आमचे सुपरहिरो' या मालिकेत डॉ. अरविंद गुप्ता, डॉ. आनंद नाडकर्णी, डॉ. प्रकाश आमटे, डॉ. अनिल अवचट, अच्युत गोडबोले यांच्या जीवनावर व कर्तृत्वावर प्रकाश टाकणाऱ्या ५ पुस्तकांचं लेखन केलं आहे. 'पासपोर्ट मॅन ऑफ इंडिया डॉ. ज्ञानेश्वर मुळे' हे त्यांचं सहावं चरित्रकथन करणारं पुस्तक राजर्षि शाहू छत्रपती विद्यानिकेतनच्या १९८४ च्या बॅचने आयोजित केलेल्या माजी विद्यार्थ्यांच्या स्नेहमेळाव्यात प्राचार्य जो. म. साळुंखे यांच्या हस्ते रविवार दि.५ फेब्रुवारी २०१७ रोजी कोल्हापूर येथे प्रकाशित झालं आहे.

विद्यार्थी, शिक्षक, शाळा, पालक, पेन, पुस्तक हे घटक एकत्र येऊन शिक्षणाचा जीवनाला जिवंत स्पर्श झाला म्हणजे ज्ञानेश्वर मुळे यांच्यासारखं मधुर फळ हाताशी येतं. स्वत:ची इच्छाशक्ती आणि कठोर परिश्रम यांच्या बळावर आकाशापर्यंत पोचण्याची जिद्द बाळगणाऱ्या एका व्यक्तिमत्त्वाचे हे चरित्र आहे.

'महात्मा जोतीराव फुले यांनी बहुजन समाजाला उपलब्ध करून दिलेली ज्ञानगंगा खेड्यापाड्यापर्यंत पोचवण्यासाठी या शाळेचा जन्म आहे. खेड्यापाड्यातील मुलं केवळ संधी मिळत नाही म्हणून गाई-म्हशीमागं फिरत राहतात, शेळ्या-मेंढ्या हाकतात. हे चित्र बदलण्याची गरज आहे. समाजाबद्दलचं स्वप्न साकार करायचं असेल तर खेड्यापाड्यात वाया जाणाऱ्या या बुद्धिमान पोरांना लहान वयातच हेरून त्यांना चालना देणं आवश्यक आहे. आज लावलेल्या या झाडाला कदाचित लगेच फळं येणार नाहीत, पण या शाळेत शिकणारी मुलं निश्चितच या देशाचं नवं भविष्य घडवतील' असे उद्गार राजर्षि शाहू छत्रपती विद्यानिकेतन, कोल्हापूर, या कोल्हापूर जिल्हा परिषदेने सुरू केलेल्या शाळेच्या उद्घाटन समारंभात कोल्हापूर जिल्हा परिषदेचे तत्कालीन उपाध्यक्ष मा. बाळासाहेब माने यांनी काढले होते. तत्कालीन महसूलमंत्री मा.बाळासाहेब देसाई आपल्या भाषणात म्हणाले होते, 'मी एका शाळेचं उद्घाटन करत नसून संपूर्ण जिल्हा शिक्षणानं समृद्ध करणाऱ्या धरणाचं उद्घाटन करतोय. इथली मुलं मातृभूमीला ललालभूत ठरोत.' छ. शिवाजीमहाराज, महात्मा जोतीराव फुले, गोपाळ गणेश आगरकर, राजर्षि शाहूमहाराज, डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या विचारांनी भारावून गेलेल्या कोल्हापूर जिल्हा परिषदेचे तत्कालीन अध्यक्ष मा. दिनकरराव यादव, उपाध्यक्ष मा.बाळासाहेब



अनुक्रमणिका






माने या व इतर दूरदृष्टीच्या नेत्यांनी 'राजर्षि शाहू छत्रपती विद्यानिकेतन' या शाळेचं बीज लावलं आणि प्राचार्य जो. म. साळुंखे यांच्या नेतृत्वाखाली श्री. शिंदे, श्री. सावंत, श्री. तावडे, श्री.सय्यद, श्री. जी. टी. महाजन, मीरा करकरे, शैला अग्निहोत्री या व इतर शिक्षकांनी खतपाणी घालून त्याचं संगोपन केलं. इतकंच नाही तर सर्वांच्या एकत्रित प्रयत्नातून ज्ञानेश्वर मुळे यांच्यासारख्या खेड्यातील पोराला इ. १०वीच्या बोर्डाच्या परीक्षेत संस्कृतमध्ये पहिला आणून जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ती प्राप्त करून शाळेच्या उद्दिष्टांची प्रतीकात्मक पूर्तता केली. 'तुझा जन्म गरुडभरारीसाठी झाला आहे,' हे कोल्हापूर येथील शहाजी महाविद्यालयाच्या प्राचार्यांचे उद्गार! या सर्व पैलूंचा एकत्रित परिणाम म्हणजे 'ज्ञानेश्वर मुळे' हे गोंडस फळ! म्हणूनच तर 'विद्यानिकेतन' मध्ये इ.५वी च्या वर्गात नव्यानंच प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांचं उद्बोधन करताना प्राचार्य जो. म. साळुंखे 'तुम्हा सर्वांना 'ज्ञानेश्वर मुळे' होण्यासाठी प्रयत्न करावयाचा आहे,' असे आवाहन सातत्याने करत होते. आपल्या गुरुजनांचा विश्वास सार्थ करणाऱ्या 'ज्ञानेश्वर मुळे' नावाच्या सुपरहिरोला व 'ज्ञानेश्वर मुळे'सारख्या विद्यार्थ्यांवर विश्वास ठेवणाऱ्या गुरुजनांना, प्राथमिक शाळेला, विद्यानिकेतनला, शहाजी महाविद्यालयालाही लेखिका या चरित्रलेखनातून अभिवादन करत आहे.

दीपा देशमुख यांनी या पुस्तकात बालपण, महाविद्यालयीन विश्व, स्पर्धा परीक्षा आणि भरारी, आगळावेगळा अधिकारी, देश-विदेश, कविता आणि फोटोग्राफी, लेखकाचा प्रवास, जगन्मित्र काय म्हणतात?, आज... या प्रकरणांच्या माध्यमातून चरित्रनायकाच्या जीवनाचा वेध घेण्याचा प्रयत्न केला आहे. देश, परदेशातील, कार्यालयातील, गावाकडील, आई, वडील, नातेवाईक, शिक्षक, मित्र इत्यादींच्या छायाचित्रांचा समावेश करून हे चरित्र अधिक बोलकं केलं आहे. याशिवाय शेवटी चरित्रनायकाचा संक्षिप्त परिचय दिला आहे. मुखपृष्ठावरील मा. ज्ञानेश्वर मुळे यांची आंतरराष्ट्रीय पातळीवर भारताचे प्रतिनिधित्व करणारी प्रसन्न भावमुद्रा वाचकांच्या मनात उज्ज्वल भवितव्याचा आशावाद निर्माण करणारी आहे. मलपृष्ठावरील मजकूर वाचकाला हे पुस्तक वाचायला प्रवृत्त करतो. पुस्तकाचं शीर्षक मिसाईल मॅन डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम यांची आठवण करून देतं.

दीपा देशमुख यांचं 'पासपोर्ट मॅन ऑफ इंडिया-ज्ञानेश्वर मुळे' हे पुस्तक वाचून वाचनप्रेमी माणूस ज्ञानेश्वर मुळे यांची 'जोनाकी' (कविता संग्रह) १९८४, 'माती, पंख आणि आकाश' (आत्मचरित्र) १९९८, 'दूर राहिला गाव' (खंडकाव्य २०००), 'माणूस आणि मुक्काम' (निबंधसंग्रह) २००४, रस्ताच वेगळा घरला (कविता) २००५, 'रशिया-नव्या दिशांचे आमंत्रण' (प्रवासवर्णन) २००६, 'स्वत:तील अवकाश' (कविता) २००६, श्री राधा (रमाकांत रथ यांची अनुवादित कविता) २००८, ग्यानबाची मेख (निबंधसंग्रह) २००९, 'नोकरशाहीचे रंग' (आत्मचरित्रपर) २००९, 'ऋतू उग रही है' (हिंदी कविता) १९९९, 'अन्दर एक आसमान' (उर्दू कविता) २००२, 'मन की खालिहानो मे' (हिंदी कविता) २००५, 'सुबह है की होती नही' (हिंदी कविता) २००८ ही साहित्यसंपदा वाचण्यास प्रवृत्त होतो. शिवाय दै.सकाळ, दै. लोकसत्ता, दै. महाराष्ट्र टाईम्स, दै. लोकमत, इ. वर्तमानपत्र व 'साधना'सारख्या नियतकालिकातील लेखन वाचण्यास उत्सुक होतो.

ही लेखिका चरित्रनायकाला शब्दबद्ध करण्याच्या निमित्ताने जपान, रशिया, मॉरिशस, सिरिया, मालदीव, अमेरिका, इ. देशांचे पर्यटन वाचकांना घडवून आणते. लहानग्यांना, शाळकरी मुलांना, महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना स्पर्धा परीक्षांना सामोरं जाण्यासाठी उद्युक्त करून चरित्रनायकासारखं भारतीय परराष्ट्र सेवेचं स्वप्न डोळ्यांसमोर ठेवते. 'आम्ही कुणाचा आदर्श ठेवावा असं कुणी शिल्लकच राहिलेलं नाही,' असं म्हणणाऱ्यांना लेखिकेनं एक समर्थ उत्तर दिलं आहे. या चरित्रामुळे लेखिकेने ज्ञानेश्वर मुळे यांचं विस्तृत चरित्रलेखन करावं असा आशावाद वाचकांच्या मनात निर्माण केला आहे. ज्ञानेश्वर मुळे यांचे व्यक्तिमत्त्व व कार्य आणि लेखिकेचं लेखन! अभिनंदनीय!! सर्वांनी वाचावं आणि संग्रही ठेवावं अशा एका चरित्राची निर्मिती केल्याबद्दल लेखिकेचं मनापासून अभिनंदन आणि ज्ञानेश्वर मुळे यांच्या गरुडभरारीला सलाम!

◆

**प्रा. डॉ .श्रीराम गडकर**
मराठी विभाग प्रमुख,
विद्या प्रतिष्ठानचे कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय,
विद्यानगरी, बारामती. ४१३१३३.
ई-मेल : shriramgadkar@gmail.com
चलभाष : ९७६४८५००३५/७२७६८४६१०६



वार्षिक कार्य अहवाल

**प्रकाश पायगुडे**

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे
# कार्य अहवाल
## १ एप्रिल २०१६ ते ३१ मार्च २०१७

**"महाराष्ट्र साहित्य परिषदेची धुरा कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्याकडे १ एप्रिल २०१६ पासून आली. त्यांच्याबरोबर प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार आणि सर्व पदाधिकाऱ्यांनी मिळून एका वर्षात मसापला प्रगतीपथावर नेण्यासाठी दमदार पावले टाकली त्याचा हा कार्य अहवाल."**

१. साहित्य परिषदेचे जन्मस्थळ असलेल्या मळेकर वाड्याची आणि मसापचे संस्थापक न्या. महादेव गोविंद रानडे, साहित्यसम्राट न. चिं. केळकर आणि लोकमान्य टिळक यांच्या प्रतिमा माधवराव पटवर्धन सभागृहात स्थापित केल्या.

२. ज्येष्ठ साहित्यसेवक म. श्री. दीक्षित यांचे नाव 'मसाप'च्या पायरीला देऊन साहित्यसेवकांचे प्रातिनिधिक स्मारक.

३. साहित्य परिषदेतील माधवराव पटवर्धन सभागृहाचे नूतनीकरण.

४. अ) साहित्य परिषदेला ई-अक्टिव्ह केले. संकेतस्थळाची पुनर्निर्मिती, फेसबुक पेज, व्हॉट्सॲप ग्रुप, ब्लॉग, ट्विटर खाते तयार आणि युनिकोडचा प्रभावी वापर. निर्मितीपासून आजपर्यंत संकेतस्थळ अद्ययावत तंत्रज्ञानाचा परिषदेला लोकाभिमुख करण्यासाठी प्रभावी वापर.

४. ब) महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे अंक व्हॉट्सॲप, फेसबुक आणि संकेतस्थळाद्वारे २५०००+ व्यक्तींना वितरीत.

४. क) मसापच्या व्हॉट्सॲप ग्रुपला ३००० पेक्षा जास्त साहित्यिक-रसिक जोडले.

४. ड) संकेतस्थळावर नि:शुल्क लेखक आणि वाचक नोंदणीची व्यवस्था केली.

५. मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड १ ते ७, मराठी भाषा : साहित्य आणि संशोधन हे ग्रंथ तंत्रस्नेही वाचकांसाठी बुक गंगाच्या मदतीने ई - बुक रूपात ही ग्रंथसंपदा ऑनलाईन खरेदी करण्याची सुविधा उपलब्ध केली.

६. साहित्य परिषदेच्या स्वतंत्र संशोधन विभागाची स्थापना, त्याद्वारे संमेलनाध्यक्षांच्या भाषणांचे पुस्तक अंतिम टप्प्यात, १०५ वर्षांतील निवडक म. सा. पत्रिका प्रकल्पाचे काम सुरू

७. महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाशी सामंजस्य करार आणि साहित्य या विषयाचे ज्ञानमंडळ म्हणून 'मसाप'ला मान्यता. भारतीय साहित्य, विश्वसाहित्य, लोकसाहित्य व लोकसंस्कृती या तीन विषयांची जबाबदारी.

८. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे यांच्या अध्यक्षतेखाली चाळीस लेखकांच्या उपस्थित बैठकीचे आयोजन.

९. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा याची आग्रही मागणी करणारे पत्र मा. पंतप्रधान नरेंद्र मोदी यांना पाठविण्याचा उपक्रम. आजवर नव्वद हजार पत्र रवाना.

१०. शिक्षणातील मराठीच्या सद्य:स्थितीविषयी चिंतन करण्यासाठी मराठी विषय शिकविणाऱ्या प्राध्यापकांच्या स्नेहमेळाव्याचे आयोजन.

११. शालेय विद्यार्थी, शिक्षक, पालक आणि नागरिकांसाठी 'सुलभ मराठी शुद्धलेखन' पुस्तिकेची निर्मिती आणि संकेतस्थळावरून मोफत डाउनलोड करून घेण्याची सुविधा

१२. शाळेतील शिक्षकांसाठी शुद्धलेखन कार्यशाळेचे आयोजन.

१३. शालेय विद्यार्थ्यांसाठी 'लेखक तुमच्या भेटीला' हा उपक्रम.

१४. अ. भा. मराठी साहित्य महामंडळ आणि मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने 'अनुवाद कार्यशाळे'चे आयोजन. अनुवादप्रेमींचा उत्स्फूर्त प्रतिसाद.

१५. संकेतस्थळावर अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांचे भाषण तत्काळ उपलब्ध करून देण्यास प्रारंभ आणि मोफत डाउनलोड करण्याची सुविधा.

१६. ज्येष्ठ साहित्यिक डॉ. आनंद यादव यांचे प्रस्तावित अध्यक्षीय भाषण ९ वर्षांनंतर मसापच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून दिले. अ. भा. मराठी साहित्य संमेलनाध्यक्षांच्या भाषणांच्या पुस्तकातही समावेश

१७. भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२५ व्या जयंती वर्षानिमित्त आंबेडकरी विचारांना वाहिलेल्या विभागीय साहित्य संमेलनाचे पाटण येथे आयोजन.

१८. पुणे आणि परिसरात फिरणारा संमेलनाचा लंबक ग्रामीण भागाकडे नेला. पाटण, चाळीसगाव, रत्नागिरी आणि पाचोरा अशा ठिकाणी संमेलने.

१९. ऐतिहासिक आणि वाङ्मयीन परंपरा लाभलेल्या माधवराव पटवर्धन सभागृहाचा अमृत महोत्सव साजरा केला. त्यानिमित्ताने माधवराव पटवर्धन स्मृतिदिनानिमित्त



अनुक्रमणिका








साहित्यप्रेमीच्या स्नेहमेळाव्याचे आयोजन करण्याची प्रथा सुरू.
२०. विश्व पंजाबी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षांच्या सत्काराचे आयोजन आणि संमेलनात सहभाग.
२१. सरहद, साहित्यदीप प्रतिष्ठान, साहित्यप्रेमी भगिनी मंडळ, एकपात्री कलाकार परिषद, आशय, सांस्कृतिक आणि अक्षरधारा या सारख्या संस्थांच्या सहयोगाने विविध वाङ्मयीन कार्यक्रमांचे आयोजन.
२२. वंचित मुलांसाठी परिषदेच्या इतिहासात प्रथमच 'अक्षरदिवाळी' चा उपक्रम.
२३. लोकनेते यशवंतराव चव्हाण यांची जयंती, गोनिदा जन्मशताब्दी, साहित्य अकादमी पुरस्कार विजेत्यांचा सत्कार, मराठी प्रकाशक परिषदेच्या नवनिर्वाचित पदाधिकाऱ्यांचा सत्कार, रवींद्रनाथ टागोरांच्या साहित्यावरील कार्यक्रम, 'कमला' नाटकाचे वाचन, कथाकथन अशा वैविध्यपूर्ण कार्यक्रमांचे आयोजन. वाचन प्रेरणा दिनाच्या निमित्ताने दुर्मीळ ग्रंथाचे प्रदर्शन.
२४. नेहमीच्या जयंती, स्मृतिदिन, व्याख्याने आणि पुरस्कारांखेरीज मसाप गप्पा, कथासुगंध, एक कवी एक कवयित्री, व्यक्तिवेध अशा वैशिष्ट्यपूर्ण कार्यक्रमांचे यशस्वी आयोजन. त्यातून नैमित्तिक कार्यक्रमाखेरीज ३० नवे कार्यक्रम सादर झाले.
२५. पुण्यात भापाप्रभू राम गणेश गडकरी यांचा पुतळा उद्ध्वस्त केल्यानंतर त्याचा तीव्र निषेध करण्यासाठी सक्रिय सहभाग. डोंबिवली येथे झालेल्या ९० व्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात या घटनेच्या निषेधाचा ठराव करण्यात यावा यासाठी मसाप तर्फे पुढाकार.
२६. परीक्षा विभागातर्फे साहित्य प्राज्ञ आणि विशारद या परीक्षांच्या अभ्यासक्रमांची पुनर्रचना. विद्यार्थी संख्येत वाढ.
२७. इमारतीचे बाहेरून रंगकाम.
२८. मसापत्रिकेच्या संपादक मंडळावर प्रथमच कार्यकारी मंडळातील सदस्य सोडून साहित्य क्षेत्रातील जाणकार आणि प्राध्यापकांना स्थान.
२९. मसापत्रिकेत शाखांच्या कार्यवृत्तांना अधिक स्थान.
३०. 'जेथे शाखा तेथे बैठक' या उपक्रमाचा प्रारंभ. वर्षातून तीन बैठका पुण्याबाहेर होणार.
३१. साहित्य परिषदेच्या आजीव सदस्यत्वाच्या अर्जात बदल. संकेतस्थळावरून मोफत डाउनलोड करण्याची सुविधा.
३२. अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनात ८०% नव्या लेखक-कवींना स्थान, ग्रामीण भागाला प्राधान्य.

### शाखांसाठी राबविलेले उपक्रम

१. वर्षभरात ३२ शाखांना प्रत्यक्ष भेटी.
२. जिल्हा प्रतिनिधींची अधिकार कक्षा वाढविली. त्यांची शिफारस जिल्ह्यातील नवीन शाखेच्या मंजुरीसाठी अनिवार्य केली.
३. जिल्हा प्रतिनिधींना शाखांचे पालकत्व दिले. त्यातून शाखा सुधार, आर्थिक सबलीकरण कार्यक्रम, प्रायोजकत्व मिळवणे, वाद मिटविणे यांना गती देण्याचा प्रयत्न.
४. शाखा सतत उपक्रमशील राहाव्यात यासाठी मसाप शाखा आणि तेथील शिक्षणसंस्थांमध्ये साहित्य-सहयोग करार घडवून आणले. त्यातून शाखा गतिमान.
५. शाखा सबलीकरण नमुना सर्व शाखांकडून भरून घेतला. त्याद्वारे शाखांच्या कार्यांचा आणि आर्थिक वस्तुस्थितींचा आढावा घेण्याचा प्रयत्न.
६. मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठीच्या पंतप्रधानांना पत्र पाठविण्याच्या उपक्रमात शाखांना सक्रिय सहभाग दिला.
७. पुण्यातील स्मृतिदिन - व्याख्याने या कार्यक्रमांचे विकेंद्रीकरण.
८. अ. भा. मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या निवडणुकीत जिल्हा प्रतिनिधींकडून नावे मागवून त्यांचा यादीत समावेश. यादी सर्वसमावेशक करण्याचा प्रयत्न.
९. अ. भा. मराठी साहित्य संमेलनात लेखक/कवींच्या सहभागासाठी जिल्ह्यांना योग्य प्रतिनिधित्व देण्याचा प्रयत्न. प्रतिनिधींकडून नावे मागवून समावेश.
१०. 'पुण्याबाहेरील कार्यवाह' असा शब्दप्रयोग टाळून 'विभागीय कार्यवाह' हा शब्द रूढ केला.

### नव्या शाखा, सभासद आणि देणग्या

९ नव्या शाखांना मान्यता
दामाजीनगर, पलूस, मनोरमा, भडगाव, अंमळनेर, जयसिंगपूर-शिरोळ, जेजुरी, सोपाननगर, येलूर
या वर्षात झालेले एकूण आजीव सभासद : ७६०
या वर्षात मिळविलेली एकूण देणगी : ५,९६,००१=००

### पुढील काळातील उपक्रम

१. दर दोन महिन्यांनी होणार कथा, कविता, कादंबरी, ललित लेखनाच्या आणि स्वामित्व हक्क तसेच साहित्य आस्वादाच्या कार्यशाळा.
२. शाखांचे आर्थिक सबलीकरण.
३. घटनेच्या मसुद्याला अंतिम रूप देणे.
४. मतदार याद्यांचे अद्ययावतीकरण.
५. मतदारांना ओळखपत्र देण्याचा उपक्रम.
६. मसाप ग्रंथालयाचे आधुनिकीकरण आणि संगणकीकरण.
७. दुर्मीळ ग्रंथांचे डिजिटायझेशन करण्यासाठी 'ग्रंथ दत्तक योजना' प्रभावीपणे राबविणार.
८. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा, यासाठी १ मेला लेखकांचे आणि वाङ्मयीन कार्यकर्त्यांचे धरणे आंदोलन.
९. बालकुमारांमध्ये साहित्याची आणि वाचनाची आवड कशी निर्माण करावी यासाठी पालकांच्या कार्यशाळा.
१०. बालकुमारांसाठीचे साहित्यसंमेलन शाखांच्या मदतीने घेणार.



कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# म.सा.प. पुणे शहर कार्यवृत्त नोंद
## (१ मार्च २०१७ ते ३१ मे २०१७)

**१) दि. १२ मार्च २०१७ :**

कै. यशवंतराव चव्हाण जयंती व्याख्यान : संस्थेचे विश्वस्त व माजी आमदार मा. उल्हासदादा पवार यांचे 'आठवणीतले यशवंतराव चव्हाण' या विषयावर भाषण झाले.

**२) दि. २२ मार्च २०१७ :**

कथासुगंध : ज्येष्ठ विनोदी कथाकार मंगला गोडबोले यांच्या 'आईच्या हातची आमटी' व 'पायरी' या दोन कथांचे अभिवाचन 'महाराष्ट्र कल्चरल सेंटर'चे शुभांगी दामले, हर्षदराज पाठक, प्रमोद काळे, जान्हवी देशपांडे यांनी सादर केले. त्यानंतर या दोन्ही कथांमागची कथा लेखिका मंगला गोडबोले यांनी उलगडून सांगितली.

**३) दि. २५ मार्च २०१७ :**

अनुवाद कार्यशाळा : महाराष्ट्र साहित्य परिषद व मराठी साहित्य महामंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने दोनशेहून अधिक अनुवादप्रेमींच्या सहभागात 'अनुवाद कार्यशाळा' घेण्यात आली. उद्‌घाटन डॉ. दामोदर खडसे यांनी केले. उमा कुलकर्णी, रवींद्र गुर्जर, भारती पांडे यांनी अनुवादाच्या विविध पैलूंबाबत मार्गदर्शन केले. 'साहित्याचा अनुवाद : वाटचाल आणि आव्हाने' या चर्चेत सुनीताराजे पवार, पांडुरंग कुलकर्णी, विजय पाध्ये यांनी सहभाग घेतला. रवींद्र गुर्जर यांनी त्यांच्याशी संवाद साधला.

**४) दि. २९ मार्च २०१७ :**

कै. शं. ना. जोशी स्मृती पुरस्कार वितरण समारंभ : डॉ. सचिन पेंडसे यांच्या 'मराठा आरमार : एक अनोखे पर्व' या ग्रंथाला अध्यक्ष डॉ. अरुणचंद्र पाठक यांच्या हस्ते देण्यात आला. निवड समितीमध्ये डॉ. सदाशिव शिवदे व प्रा. गणेश राऊत हे होते. यावेळी बलवंत शंकर जोशी व मोरेश्वर शंकर जोशी हे उपस्थित होते.

**५) दि. १० एप्रिल २०१७ :**

ज्ञानकोशकार कै. श्री. व्यं. केतकर स्मृतिदिन : दरवर्षीप्रमाणे पुण्यातील कमला नेहरू उद्यानातील केतकरांच्या समाधीस फुले व पुष्पहार अर्पण केला. सु. वा. जोशी, श्याम भुर्के, ब्रिटिश कौन्सिल लायब्ररीचे माजी ग्रंथपाल वसंतराव जोशी, कार्यवाह दीपक करंदीकर, शिरीषा चिटणीस व अन्य नागरिक उपस्थित होते. केतकरांचे जीवनकार्य व आयुष्य यांचे स्मरण सर्वांनी केले.

**६) दि. १४ एप्रिल २०१७ :**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती : मसापच्या सभागृहात डॉ. आंबेडकर यांच्या विषयीच्या व त्यांनी स्वतः लिहिलेल्या दुर्मीळ ग्रंथांचे प्रदर्शन दि.१४ व १५ एप्रिल २०१७ असे दोन दिवस भरविण्यात आले. आमदार ॲड. जयदेव गायकवाड यांच्या हस्ते प्रदर्शनाचे उद्‌घाटन झाले. पत्रकार अरुण खोरे उपस्थित होते. डॉ. भीम गायकवाड यांनी बाबासाहेबांविषयीचे गीत व परिषदेचे कार्यवाह दीपक करंदीकर यांनी सुरेश भटांनी लिहिलेली 'भीमवंदना' सादर करून वातावरण निर्मिती केली. प्रदर्शनात परिषदेच्या वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय, संस्कृती प्रकाशन, भारतीय विचार साधना, शब्दांगण, प्रकाश पायगुडे या संस्था व व्यक्तींच्या संग्रहातील ग्रंथ व राज्यघटना मांडण्यात आली होती. नागरिकांनी दोन दिवसात प्रदर्शनाला भेट दिली.

**७) दि. १८ एप्रिल २०१७ :**

एक कवी एक कवयित्री : अनिल कांबळे व डॉ. अनुपमा उजगरे यांचे कविता वाचन व नंतर त्यांच्याशी संवाद झाला. मृणालिनी कानिटकर-जोशी यांनी संवादिकेचे काम केले.

**८) दि. २२ एप्रिल २०१७ :**

ग्रंथाळलेल्या हातांचा सन्मान : पुण्यातील विविध पादचारी मार्गांवर, ठरावीक जागी, वर्षानुवर्षे, जुन्या दुर्मीळ पुस्तकांची विक्री करणाऱ्यांचा सत्कार डॉ. श्रीकांत बहुलकर यांच्या हस्ते करण्यात आला. समीर अब्दुलगनी कलारकोप, प्रभाकर साळुंखे, पोपट महादेव वाबळे, लक्ष्मी पोपट वाबळे, प्रशांत कदम, राजेंद्र लिंबोरे, दत्तात्रय ज. जोशी, कपील पराडकर हे सत्कारार्थी होते. पैकी काहींनी मनोगते व्यक्त केली. रवींद्र गुर्जर, श्याम जोशी यांनी सत्कारार्थींविषयी माहिती दिली. जागतिक ग्रंथ दिनाच्या पूर्वसंध्येच्या निमित्ताने परिषद व स्वायत्त मराठी विद्यापीठ, बदलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने हा कार्यक्रम आयोजिला होता.

**९) दि. २४ एप्रिल २०१७ :**

कृष्ण मुकुंद ऊजळंबकर पुरस्कार समारंभ : 'पुरंदरचे धुरंधर' या ग्रंथासाठी लेखक शिवाजीराव एक्के यांना ॲड. उमेश सणस यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. नलिनी गुजराथी यांनी ऊजळंबकर यांच्याविषयी मनोगत व्यक्त केले. त्यांचा व मोहन गुजराथी व सुधीर ऊजळंबकर यांचे सत्कार करण्यात



अनुक्रमणिका








आले. उमेश सणस यांनी अध्यक्षीय समारोप केला.

**१०) दि. २६ एप्रिल २०१७ :**

कमोडर म. के. लेले स्मृतिदिन व्याख्यान : ॲड. असीम सरोदे यांचे 'न्यायालयीन सक्रियता : काल आणि आज' या विषयावर व्याख्यान झाले. डॉ. वि. वि. घाणेकर यांनी लेले यांच्याविषयी मनोगत व्यक्त केले. अतिशय अभ्यासपूर्ण व वास्तवपूर्ण असे हे व्याख्यान झाले.

**११) दि. ३० एप्रिल २०१७ :**

खास मे महिन्याच्या सुट्टीचे औचित्य साधून शालेय विद्यार्थ्यांपासून ते आजी-आजोबा आणि पालक यांच्या उपस्थितीत 'आमचं पण ऐका ना' हा बालचमूच्या प्रत्यक्ष सहभागाचा कार्यक्रम परिषदेने आयोजित केला. दीप्ती आसवडेकर, निशांत, शार्दूल आसवडेकर, सिद्धार्थ व सुखदा दामले, सिद्धार्थ करंदीकर, मुग्धा परचुरे, सन्मित्र देवरे, अवनी भिडे, सानिका खरे, स्वानंदी कांबळे, सौरभ विरजे ही सर्व कलाकार मंडळी या अभिनव कार्यक्रमात होती.

**१२) दि.४ मे २०१७ :**

अभिजात मराठी भाषा-निवेदन व येथील पुस्तकाच्या गावाला भेट : महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सातारा शाखेच्या श्री. विनोद कुलकर्णी यांच्या पुढाकाराने पंतप्रधानांना पाठविण्यात आलेल्या मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळण्यासाठी पत्रांच्या माहिमेचाच पुढचा भाग म्हणून दि. ४ मे २०१७ रोजी पाचगणी येथील हेलिपॅडवर मा. मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांना मसापच्या शिष्टमंडळाने कार्याध्यक्ष मिलिंद जोशी यांच्या नेतृत्वात निवेदन देण्यात आले. या शिष्टमंडळात सातारा शाखेचे विनोद कुलकर्णी व त्यांचे सहकारी, तसेच फलटण शाखेचे रवींद्र बेडकिहाळ व त्यांचे सहकारी व पुणे केंद्राचे सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर, वि. दा. पिंगळे, राजन लाखे इत्यादींचा सहभाग होता. याचवेळी फलटण शाखेतर्फे कवी बा. सी. मर्ढेकर यांच्या मर्ढे या गावी 'पुस्तकांचे गाव' ही योजना राबविली जावी असेही निवेदन मुख्यमंत्र्यांना रवींद्र बेडकिहाळ यांनी केले. त्यानंतर सर्वांनी पुस्तकांचे गाव - भिलारला भेट दिली.

**१३) दि. ९ मे २०१७ :**

मसाप गप्पा : रामदास फुटाणे यांच्याशी कोषाध्यक्ष व प्रकाशिका सुनीताराजे पवार यांनी संवाद साधला.

**१४) दि. २१ मे २०१७ :**

कै. रेखा ढोले स्मृती पुरस्कार समारंभ : मसाप व राजहंस प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने सुहास बहुळकर यांच्या अध्यक्षतेखाली पुरस्कार वितरण झाले. सुनंदा महाजन यांना 'केल्याने भाषांतर' या नियतकालिकाच्या संस्थापक-संपादक म्हणून व चंद्रमोहन कुलकर्णी यांच्या 'रस्किन बाँड' या पुस्तकाला उत्कृष्ट मुखपृष्ठ आणि अंतर्गत सजावटीचा पुरस्कार बहुळकर यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. त्याचप्रमाणे रोहन प्रकाशनाला सर्वोत्कृष्ट निर्मितिमूल्याचा पुरस्कार देण्यात आला. निवड समिती सदस्या वर्षा गजेंद्रगडकर यांनी मनोगत व्यक्त केले. पुरस्कार विजेत्यांनी मनोगते व्यक्त केली. सुहास बहुळकरांचे अध्यक्षीय भाषण झाले. त्याअगोदर डॉ. श्रीराम गीत व प्रवीण ढोले यांनी विचार मांडले.

**१५) दि. २४ मे २०१७ :**

पुष्पा पुसाळकर पुरस्कार वितरण समारंभ : राजीव बर्वे यांच्या 'मनःस्पर्श' या कवितासंग्रहासाठी राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आला. प्रकाशिका प्रा. रुपाली अवचरे व निवड समितीसदस्य ल. म. कडू उपस्थित होते.

**१६) दि. २५ मे २०१७ :**

कै. प्रा. रा. ग. जाधव प्रथम स्मृतिदिन : 'आजचा समीक्षा व्यवहार' या विषयावर डॉ. रेखा इनामदार-साने यांचे व्याख्यान झाले. हा कार्यक्रम साधना साप्ताहिक व मसाप यांच्या संयुक्त विद्यमाने झाला. अध्यक्षस्थानी विनय सहस्रबुद्धे होते. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी व विनोद शिरसाट या दोघांनी आपले प्रास्ताविकपर विचार मांडले.

**१७) दि. २६ मे व २७ मे २०१७ :**

मसाप वर्धापन दिन समारंभ : दि. २६ मे रोजी वार्षिक ग्रंथ व ग्रंथकार पुरस्कार वितरण झाले. साहित्य अकादमी पुरस्कार प्राप्त प्रसिद्ध कन्नड लेखिका मा. वैदेही या प्रमुख पाहुण्या व परिषदेचे अध्यक्ष व थोर विचारवंत डॉ. रावसाहेब कसबे हे समारंभाचे अध्यक्ष होते. या दोन्ही दिवशी चौघडावादनाने उपस्थितांचे स्वागत करण्यात आले होते. त्याचबरोबर टिळक रस्त्यावरील परिषदेच्या इमारतीला विद्युत रोषणाई करण्यात आली होती. चंद्रकांत शेवाळे व उल्हासदादा पवार यांची उपस्थिती होती. तसेच साहित्यिक, पुरस्कारार्थी, साहित्यप्रेमींची भरघोस उपस्थिती होती. (विशेष ग्रंथ पुरस्कार व वार्षिक ग्रंथ पारितोषिके यांची यादी सोबत प्रकाशित केली आहे.) शाहीर मावळे यांच्या महाराष्ट्रगीताने समारंभाची सुरुवात झाली.

**दि. २७ मे २०१७ :**

परिषदेचा १११वा वर्धापनदिन समारंभ : ज्येष्ठ विचारवंत पुष्पा भावे या मुख्य अतिथी म्हणून उपस्थित होत्या. अध्यक्षपद डॉ. रावसाहेब कसबे यांनी भूषविले. परिषदेचा जीवन गौरव पुरस्कार व्याकरणतज्ज्ञ व ज्येष्ठ लेखिका यास्मिन शेख यांना भावे यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार डॉ. सु. प्र. कुलकर्णी (मसाप पत्रिकेचे माजी संपादक व अहमदनगर शाखेचे सन्माननीय कार्यकर्ते) यांना प्रदान करण्यात आला. राजा फडणीस पुरस्कृत 'उत्कृष्ट मसाप शाखा' हा 'फिरता करंडक' मसापच्या चाळीसगाव शाखेला प्रदान करण्यात आला. रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिला जाणारा 'मसाप कार्यकर्ता' पुरस्कार नंदा सुर्वे व नंदकुमार सावंत यांना देण्यात आला. अमृतमहोत्सवी वाटचालीबद्दल मसापच्या सोलापूर शाखेला विशेष सन्मानित करण्यात आले. तसेच ॲड. प्रमोद

आडकर व राजन लाखे व वि. दा. पिंगळे यांना विशेष सांस्कृतिक, साहित्यिक कार्याबद्दल भावे यांच्या हस्ते सन्मानित करण्यात आले. ज्योत्स्ना नांदर्गीकर, संदीप खाडे, पराग कुलकर्णी, राजेंद्र तुपे, दिपाली बागवे, भारती निनगुरकर, तृप्ती कुलकर्णी या कार्यालयीन सेवकांचा अध्यक्षांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. शिवाजीराव कदम व मा. उल्हासदादा पवार व उपाध्यक्षा निर्मला ठोकळ इ. मान्यवर उपस्थित होते. पुरस्कारार्थींची भाषणे झाली. सुनीती लिमये यांनी शारदा स्तवन सादर केले.

**ताजा कलम :** या सर्व कार्यक्रमांची प्रास्ताविके, सूत्रसंचालने, आभार प्रदर्शन इत्यादी कामे परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, कार्यवाह दीपक करंदीकर, बंडा जोशी, प्रमोद आडकर, उद्धव कानडे, वि. दा. पिंगळे यांनी वेळोवेळी केली आहेत. ◆

कार्यवृत्त नोंद शब्दांकन
**दीपक करंदीकर**
कार्यवाह मसाप, पुणे

---

## ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिक प्रदान समारंभ

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा **'जीवनगौरव पुरस्कार'**
**ज्येष्ठ लेखिका यास्मिन शेख** (व्याकरणतज्ज्ञ) यांना आणि
**'भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' डॉ. सु. प्र. कुलकर्णी** यांना सन्मानपूर्वक प्रदान करण्यात येईल.

**राजा फडणीस पुरस्कृत उत्कृष्ट मसाप शाखा 'फिरता करंडक' महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा चाळीसगाव** यांना
आणि रत्नाकर कुलकर्णी यांच्या स्मरणार्थ दिले जाणारे
**'मसाप कार्यकर्ता' पुरस्कार श्रीमती नंदा सुर्वे आणि श्री. नंदकुमार सावंत**
यांना तसेच याच कार्यक्रमात **अमृतमहोत्सवी वाटचालीबद्दल मसाप सोलापूर शाखेचा विशेष सत्कार** करण्यात येईल.

## विशेष ग्रंथकार पुरस्कार (२६ मे २०१७)

| पुरस्काराचे नाव | पुरस्कार विजेते |
|---|---|
| • डॉ. शं. दा. पेंडसे स्मृती पुरस्कार (संतसाहित्यविषयक लेखकास) | सुनील चिंचोलकर |
| • कृष्णराव फुलंब्रीकर स्मृती पुरस्कार (संगीतविषयक/समीक्षा) | डॉ. सुलभा ठकार |
| • कविवर्य भा. रा. तांबे पुरस्कार (ज्येष्ठ कवी-कवयित्रीस) | सायमन मार्टिन |
| • कविवर्य ना. घ. देशपांडे पुरस्कार (गेय कविता लिहिणाऱ्या कवीस) | म. भा. चव्हाण |
| • प्रा. गो. रा. परांजपे पुरस्कार (विज्ञानविषयक लेखन करणाऱ्या ज्येष्ठ लेखकास) | डॉ. पी. व्ही. जोशी |
| • श्रीपाद जोशी पुरस्कार (संदर्भ ग्रंथ, अनुवाद-आंतरभारती कार्य) | डॉ. गजानन चव्हाण |
| • कमलाकर सारंग पुरस्कार (नाट्यसंहिता/नाटककार) | राजीव नाईक |
| • ज्येष्ठ लेखिका कै. ज्योत्स्ना देवधर पुरस्कृत लेखिका पुरस्कार | प्रमोदिनी वडके-कवळे |
| • प्रभाकर संत पुरस्कृत कै. आशा प्र. संत पुरस्कार (संपादन क्षेत्रातील लक्षणीय) | विष्णू जोशी |
| • यशवंतराव गडाख पुरस्कृत श्रीमती ताईसाहेब कदम पुरस्कार (साहित्य पत्रिकेतील उत्कृष्ट लेखास) | देवानंद सोनटक्के |
| • ज्येष्ठ संपादक-लेखक रा. अ. कुंभोजकर स्मृती पुरस्कार (सृजनशील लेखन करणाऱ्या पत्रकार/संपादकास) | मल्हार अरणकल्ले |
| • कै. ग. ह. पाटील पुरस्कार (बालसाहित्यकार/शिक्षणविषयक) | प्रा. राजकुंवर सोनवणे |
| • विभागून 'शाळा आणि शहाणी मुले', 'बालरंग' | बाळकृष्ण बाचल |
| • डॉ. वि. कृ. गोकाक स्मृती पुरस्कार (ज्येष्ठ लेखकास) | प्रा. मधु जामकर |

## वार्षिक ग्रंथ पारितोषिके (२६ मे २०१७)

| पारितोषिकाचे नाव | ग्रंथाचे नाव | पारितोषिक विजेते |
|---|---|---|
| माधुरी वैद्य पुरस्कृत श्रीवत्स प्रकाशनातर्फे विपुलश्री पुरस्कार (संपादितग्रंथ) | 'स्त्री-लिखित मराठी कविता' | डॉ. अरुणा ढेरे |
| वासुदेव धोंडो व भागिरथीबाई दीक्षित पारितोषिक (संतसाहित्य, धार्मिक) | 'श्रीक्षेत्र पंढरपुरातील मठांचा इतिहास' (फड आणि दिंड्या यांसह) | वा. ल. मंजूळ |
| ग. ल. ठोकळ पारितोषिक (ग्रामीण साहित्य) | 'माझे गाव माझे जगणे' | अरुण शेवते |
| प्रा. उमाकांत कीर पुरस्कृत कृष्णाजी वामन कीर पुरस्कार (ललित लेख/ललित निबंध) | 'देठ जगण्याचा' | डॉ. नीलिमा गुंडी |
| शरद्चंद्र मनोहर भालेराव स्मृती पुरस्कार (लक्षवेधी साहित्य ग्रंथास) | 'संरक्षण तज्ज्ञ, अंतर्गत सुरक्षा तज्ज्ञ डॉ. बाबासाहेब आंबेडकर' | प्रा. डॉ. विजय खरे |
| नी. स. गोखले पारितोषिक (उत्कृष्ट ग्रंथनिर्मिती) | 'गेले लिहायचे राहून' | राजहंस प्रकाशन |
| कीर्तन संजीवनी पुष्पलता रानडे पुरस्कृत लक्ष्मीबाई टिळक पारितोषिक (आत्मचरित्र) | 'सय-माझा कलाप्रवास' | सई परांजपे |
| शिवाजी सावंत पुरस्कृत राधाबाई सावंत स्मरणार्थ मृत्युंजय पारितोषिक (पौराणिक, वेदपुराण, रामायण, महाभारत) | 'प्राचीन भारतीय राष्ट्रधर्म' | प्रभाकर पुजारी |
| कमल भागवत व के. पी. भागवत पारितोषिक (मानसशास्त्र, समाजशास्त्र, स्त्रीजीवनशास्त्र) | 'मनकल्लोळ भाग १ व २' | डॉ. अच्युत गोडबोले<br>नीलांबरी जोशी |
| स.रा. गाडगीळ पुरस्कृत विजया गाडगीळ स्मृती पारितोषिक (उत्कृष्ट वाङ्मयमूल्य असलेल्या ग्रंथास) | 'प्रतिभा आणि सर्जनशीलता' | डॉ. सुधाकर देशमुख |
| अरविंद वामन कुलकर्णी स्मृती पारितोषिक (उत्कृष्ट कवितासंग्रह, सामाजिक आशय, समीक्षा) | 'स्वतःतल्या परस्त्रीच्या शोधात' | सुजाता महाजन |
| वि. वि. बोकील स्मृती पारितोषिक (उत्कृष्ट बालवाङ्मय) विभागून | गद्य-'गंमत गोष्टी आधुनिक बोधकथा'<br>पद्य-'मुलाफुलांची गाणी' | संगीता पुराणिक<br>संजय ऐलवाड |
| डॉ. अंबादास माडगूळकर पारितोषिक (सामाजिक आशयाच्या ग्रंथास) | 'ग्राहक राजा, सजग हो!' | विवेक वेलणकर |
| शरद्चंद्र मनोहर भालेराव पारितोषिक (सामाजिक आशयाच्या प्रबंधलेखनासाठी) | 'कामगार कवितेतील सामाजिक जाणिवा' (प्रबंध) | डॉ. दिलीप पवार |
| माधव मदाने पुरस्कृत शरच्चंद्र चिरमुले पुरस्कार (उत्कृष्ट कथासंग्रह) | 'विजबाई' | राहुल गोविंद निकम |
| सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत डॉ. पुष्पा शिरोळे पारितोषिक (आहार, आरोग्य, अध्यात्म) | 'गोष्टीरूप हरिपाठ' | अनिल म. फडणवीस |
| सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत मालिनी शिरोळे पारितोषिक (स्तंभलेखन, ग्रंथास) | 'सेक्युलर्स नव्हे फेक्युलर्स' | डॉ. सच्चिदानंद शेवडे |



अनुक्रमणिका

| | | |
|---|---|---|
| • सागर/वसुंधरा शिरोळे पुरस्कृत ॲड. त्रिंबकराव शिरोळे पारितोषिक (ललितगद्य) | 'भुईरिंगण' | रश्मी काशेळकर |
| • डॉ. उज्ज्वला गोखले पुरस्कृत सुभाष हरि गोखले पारितोषिक (बँकिंग, व्यवस्थापन, अर्थशास्त्र) | 'वित्तार्थ' | डॉ. रूपा रेगे-नित्सुरे |
| • वा. म. जोशी पारितोषिक (कादंबरी) | 'विरंगी मी! विमुक्त मी!' | अंजली जोशी |
| • ह. श्री. शेणोलीकर पारितोषिक (समीक्षा) | 'ग्रेस-अंबरफुलांचे दिवे' | डॉ. चं. वि. जोशी |
| • लोकहितवादी गोपाळ हरी देशमुख पारितोषिक (ललितेतर वैचारिक) | 'शिक्षण विवेक' | वा. ना. अभ्यंकर |
| • ज. रा. कदम पारितोषिक (कृषीतज्ज्ञ) | 'तांत्रिक दृष्टिकोनातून सेंद्रिय शेती' | प्रशांत नाईकवडी |
| • स. ह. मोडक पारितोषिक (अनुवादित ग्रंथ/अनुवादक) | 'मी झारा गहरमानी : एक देशद्रोही' | रेश्मा कुलकर्णी |

### वार्षिक ग्रंथ आणि ग्रंथकार पारितोषिकासाठी काम पाहिलेले परीक्षक

डॉ. राजा दीक्षित, प्रा. शिवाजीराव मोहिते, डॉ. न. म. जोशी, रविमुकुल, जयदीप कद्रू, डॉ. नीलिमा गुंडी, राजेंद्र देशपांडे, डॉ.कल्याणी हर्डीकर, राजेंद्र खेर, डॉ. वर्षा तोडमल, प्रा. नानासाहेब झगडे, डॉ. मेघा सिधये, हेमंत जोगळेकर, मनीषा दीक्षित, प्रभा सोनवणे, डॉ.ज्योती रहाळकर, डॉ. सिद्धार्थ आगळे, प्रा. नितीन लगड, प्रा. डॉ. संदीप सांगळे, श्री. नितीन शिंदे, डॉ. मनोहर जाधव, डॉ. प्रभाकर देसाई, रसिका राठिवडेकर, श्याम भुर्के, प्रा. क्षितिज पाटुकले, श्रीकांत कुलकर्णी, घनश्याम पाटील, आश्लेषा महाजन, मृणालिनी कानिटकर, सदा डुंबरे, सौ. रविबाला काकतकर, सौ. श्रद्धा कुलकर्णी, नीलिमा बोरवणकर, संगीता पुराणिक, डॉ. सु. प्र. कुलकर्णी ह. ल. निपुणगे, डॉ. अरुणा ढेरे, डॉ. रामचंद्र देखणे, डॉ. अश्विनी धोंगडे, अंजली कुलकर्णी, प्रा. बाजीराव गायकवाड, प्रा. भाऊसाहेब भोसले, मीरा शिरसमकर, अभिजीत थिटे, वैशाली मोहिते, प्रा. चंद्रकांत वानखेडे, प्रा. डॉ. अरुण कोळेकर, डॉ. बाबासाहेब शेंडगे

## मसाप : पिंपरी-चिंचवड शाखा

**१. दिनांक २३ एप्रिल २०१७ :**

मसाप शाखा पिंपरी-चिंचवडने 'जागतिक ग्रंथदिना'चे आयोजन करून निरपेक्ष वृत्तीने ग्रंथसेवा करणाऱ्यांचा सन्मान करून 'ग्रंथदिन' वेगळ्या पद्धतीने साजरा केला. त्याचप्रमाणे शाखेच्या कार्यालयात पुस्तकाचे प्रदर्शन भरवण्यात आले. सदर पुस्तक प्रदर्शनाचे उद्घाटन ज्येष्ठ साहित्यिक भारत सासणे यांच्या हस्ते झाले. या वेळी पिंपरी-चिंचवड शहरात ११ वर्षे पुस्तके व ग्रंथ हाताळणारे आणि सातत्याने पुस्तके वाचकांपर्यंत पोचविण्यासाठी विविध योजना राबविणारे दत्तात्रय डांगे यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी मसाप पिंपरी-चिंचवडचे अध्यक्ष राजन लाखे, कार्याध्यक्षा श्रीमती विनिता ऐनापुरे, उपाध्यक्ष डॉ. रजनी शेठ, सामाजिक कार्यकर्ते संभाजी बारणे तसेच नितीन सुतार, प्रकाश परदेशी, रघुनाथ पाटील, बबनराव सुतार आदी उपस्थित होते. किशोर पाटील, माधुरी मंगरुळकर, दत्तु ठोकळे, रुचिता देशपांडे यांनी संयोजन केले, तर संजय जगताप यांनी आभार मानले.

**२.** महाराष्ट्र साहित्य परिषद पिंपरी चिंचवड शाखेतर्फे संपूर्ण दिवसाची 'कथा लेखन कार्यशाळा' आयोजित करण्यात आली. सदर कार्यशाळेस श्रीमती विनिता ऐनापुरे, डॉ. रजनी शेठ व प्रकाश निर्मळ यांनी मार्गदर्शन केले. मसाप पिंपरी-चिंचवडचे अध्यक्ष राजन लाखे यांचे हस्ते कार्यशाळेचे उद्घाटन करण्यात आले.

**३) दि. २६ एप्रिल २०१७ :**

राज्यस्तरीय कथा व काव्य स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ : डॉ. शैलेश गुजर, भारत सासणे हे उपस्थित होते. १०१ कविता आणि ५५ कथांचा समावेश स्पर्धेत होता. श्रीमती ऐनापुरे, डॉ. रजनी शेठ, पितांम्बर लोहार, रघुनाथ पाटील हे परीक्षक होते. विजेत्यांची नावे :-

**कथा :**

लक्ष्मण दिवटे (बीड), कथा : ठिगळ, प्रथम क्रमांक

श्वेता कुलकर्णी (पुणे), कथा : जागृती, द्वितीय क्रमांक

मोहना टिपणीस(पुणे),कथा :ओझे मनावरचे, तृतीय क्रमांक

रोशनकुमार पिलेवान (चंद्रपूर), आसावरी इंगळे (जामनगर), कमल सोनजे (पुणे) : उत्तेजनार्थ

**कविता:**

रोशनकुमार पिलेवान (चंद्रपूर), कविता : अभंग, प्रथम,

श्रीराम रायते (पुणे), कविता : सपान, द्वितीय,

अजय चव्हाण (पुणे), कविता : आयुष्याचे लक्तर, तृतीय

डी. बी. शिंदे, अश्विनी रानडे, माधुरी मंगरुळकर : उत्तेजनार्थ

किशोर पाटील, मकरंद बापट, किरण लाखे, राजन लाखे, विजय नाईक व संजय जगताप यांनी आयोजनातील विविध कामे केली.

## मसाप : सातारा शाखा

**मसापच्या सातारा शाखेच्या नूतन पदाधिकाऱ्यांचे पदग्रहण**

महाराष्ट्र साहित्य परिषद, सातारा शाखेच्या नूतन पदाधिकाऱ्यांचा पदग्रहण समारंभ मंगळवार दि. ३० मे २०१७ रोजी सायं. ६ वाजता येथील श्री. छ. प्रतापसिंह महाराज (थोरले) नगर वाचनालयाच्या पाठक हॉलमध्ये संपन्न झाला.

या समारंभात दर्पण पुरस्कार मिळाल्याबद्दल 'दै. ऐक्य'चे कार्यकारी संपादक वासुदेव कुलकर्णी 'दै. पुढारी'चे हरीष पाटवे व मसापचा आदर्श कार्यकर्ता पुरस्कार मिळाल्याबद्दल नंदकुमार सावंत यांचा सत्कार करण्यात आला. मसापच्या सातारा शाखेच्या नूतन कार्यकारिणीत प्राचार्य रमणलाल शहा, (अध्यक्ष), डॉ. सुरेश गायकवाड (उपाध्यक्ष), डॉ. महेश गायकवाड (कार्याध्यक्ष), हृषिकेश सारडा (कार्यवाह), विकास धुळेकर (सहकार्यवाह), विजयकुमार लांडगे (कोषाध्यक्ष), वि. ल. काल्गावकर व प्रा. मुरलीधर जगताप (सदस्य) या सर्वांचा मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या हस्ते पुष्पगुच्छ देऊन सत्कार करण्यात आला.

## मसाप : जुळे सोलापूर शाखा

**अ) दि. २४ मार्च २०१७ :**

अध्यक्ष पद्माकर कुलकर्णी यांची महामंडळावर 'सदस्य' म्हणून निवड झाल्याबद्दल कार्याध्यक्षा सायली जोशी यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला.

**ब) दि. २६ मार्च २०१७ :**

स्व. श्रीनिवास विष्णू रायते गुरुजी बालसाहित्यिक पुरस्कार - बालसाहित्यिक एकनाथ आव्हाड यांना प्रा. ए. डी. जोशी यांच्या हस्ते प्रदान करण्यात आला. नारायण कुलकर्णी अध्यक्षपदी होते.

**क) दि. ९ एप्रिल २०१७ :**

स्व. रामनिवासजी शुभकरणजी फोफलिया स्मरणार्थ राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा २०१६ चा पुरस्कार वितरण सोहळा व स्व. श्रीनिवास जोशी स्मरणार्थ आदर्श शिक्षक पुरस्कार व दोन शैक्षणिक पुरस्कार श्री. सुनील शिनखेडे यांच्या हस्ते व मा. ब्रिजमोहन फोफलिया यांच्या अध्यक्षतेखाली झाला. दत्ता आण्णा सुरवसे यांची प्रमुख उपस्थिती होती. दिवाळी अंक २०१६ निकाल असा :

प्रथम क्रमांक : थिंक पॉझिटिव्ह, द्वितीय क्रमांक : जडण घडण, तृतीय क्रमांक : विशाखा, उत्कृष्ट विनोदी दिवाळी अंक : हास्यधारा, सोलापूर शाखा, विशेष पुरस्कार : मंगळवेढा- सप्तर्षी, याचबरोबर आदर्श शिक्षक पुरस्कार : संगप्पा मुक्कामे, भंडारकवठे यांना देण्यात आला.

**ड) दि. २० एप्रिल २०१७ :**

सुंदर हस्ताक्षर लेखन कार्यशाळा : मसाप जुळे सोलापूर व महानगरपालिका प्राथमिक शिक्षण मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने ही कार्यशाळा दि. २० व २१ एप्रिल रोजी आयोजित करण्यात आली. प्रशासनाधिकारी सुधा साळुंके व सह-आयुक्त अभिजित हराळे व हस्ताक्षर तज्ज्ञ अभिजित भडंगे यांसह सुमारे २०० शिक्षकांची उपस्थिती होती.

**इ) दि. ७ मे २०१७ :**

मसाप शाखा व वसुंधरा कॉलेज, सुविद्या प्रकाशन, सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने ग्रंथप्रदर्शन भरविण्यात आले. उद्घाटन नयन नोगजा यांच्या हस्ते व डॉ. बी. व्ही. चौधरी यांच्या अध्यक्षतेखाली झाले. हे प्रदर्शन तीन दिवस खुले होते.

**ई) दि. ८ मे २०१७ :**

प्रदर्शनाच्या निमित्ताने कवी संमेलन झाले. अध्यक्ष श्रीकांत कुलकर्णी व सूत्रसंचालन माधव पवार यांनी केले. मारुती कटकधोंड, गोविंद काळे, राजेंद्र भोसले, गिरीश दुनाखे, बदिउज्जमा बिराजदार, निर्मला मठपती, वंदना कुलकर्णी या कवींचा सहभाग होता.

या सर्व कार्यक्रमांच्या आयोजनाची कामे प्रशांत जोशी, गिरीश दुनाखे, संदीप कुलकर्णी, श्रीकांत कुलकर्णी, अचला राचली, डॉ. वासुदेव रायते, अर्पिता खडकीकर, सचिन चौधरी, पद्माकर कुलकर्णी , दीपाली जोशी, शिवाजी शेटे,

फैयाज शेख, मारुती कटकधोंड इत्यादींनी केली.

फ) महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर आणि प्रिसिजन फाउंडेशन, सोलापूर संयुक्त विद्यमाने आयोजित स्व. दत्ता हलसगीकर श्रेष्ठ सहित्यिक पुरस्कार २०१७ प्रदान सोहळा संपन्न झाला. यंदाचे वर्षी कवी व गीतकार म्हणून सुप्रसिद्ध असलेले मा.संदीप खरे यांना हा पुरस्कार, ज्येष्ठ पत्रकार आणि चिंतन ग्रुप पुणेचे संस्थापक अध्यक्ष मा. अभिनंदन थोरात यांच्या शुभहस्ते व मसाप पुणेचे प्रमुख कार्यवाह मा. प्रकाश पायगुडे यांच्या अध्यक्षतेखाली सन्मानपूर्वक प्रदान करण्यात आला. रोख रु. ११,०००/-, चांदीचे कमळ असलेले स्मृतीचिन्ह, सन्मानपत्र, शाल व श्रीफळ असे या पुरस्काराचे स्वरूप आहे.

या पुरस्कार सोहळ्यानंतर लगेचच कवी संदीप खरे यांची प्रकट मुलाखत, मा. प्रकाश पायगुडे यांनी घेतली.

◆

## शाखा सोलापूर (मुख्य शाखा)

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त मसाप, सोलापूर शाखा व डॉ. निर्मलकुमार फडकुले प्रतिष्ठान, सोलापूर यांचे संयुक्त विद्यमाने सोलापूरमध्ये प्रथमच कैलास भिंगारे यांनी संकलित केलेल्या व्यंगचित्रांचे प्रदर्शन डॉ. फडकुले संकुल, सोलापूर येथे आयोजित करण्यात आले. या प्रदर्शनाचे उद्घाटन माजी केंद्रीय गृहमंत्री सुशीलकुमार शिंदे यांचे हस्ते पार पडले.

यावेळी सोलापुरातील व्यंगचित्रकारांचा सत्कार करण्यात आला. तसेच डॉ. अब्दुल कलाम यांच्या कार्यावर आधारित लघुपट दाखवण्यात आला. या प्रदर्शनात जगविख्यात व्यंगचित्रकार आर. के. लक्ष्मण, शिवसेनाप्रमुख बाळासाहेब ठाकरे, वसंत सरवटे, शि. द. फडणीस, ज्ञानेश सोनार, विकास सबनीस, प्रभाकर झळके, विजय पराडकर, संजय मिस्त्री, प्रशांत कुलकर्णी, सुरेश लोटलीकर यांनी रेखाटलेली व्यंगचित्रे उपलब्ध करून देण्यात आली होती. प्रदर्शनाच्या अखेरच्या दिवशी दि. १५ रोजी समारोप समारंभ संपन्न झाला. या परिसंवादात पत्रकार अमोल अंकुलकर, श्रीकांत साबळे, चित्रकार हेमंत कपुरे यांचा सहभाग होता.

**राम गणेश गडकरी पुण्यतिथी :**

राम गणेश गडकरी यांच्या ९८व्या पुण्यतिथीनिमित्त विनय हर्डीकर (पत्रकार, लेखक, संपादक) यांच्या 'दोन महान नाटककार : राम गणेश गडकरी आणि विल्यम शेक्सपिअर' या विषयावरील व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले होते.

**२७ फेब्रुवारी २०१७ : मराठी भाषा दिन कार्यक्रम :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा-सोलापूर व सोलापूर विद्यापीठ यांच्या संयुक्त विद्यमाने कवी कुसुमाग्रज जयंतीनिमित्त मराठी भाषा गौरव दिन साजरा करण्यात आला. कार्यक्रमाच्या सुरुवातीला ग्रंथदिंडीचे आयोजन करण्यात आले होते. या वेळी माजी निवडणूक आयुक्त नीला सत्यनारायण यांच्या व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले.

**जागतिक महिला दिनानिमित्त व्याख्यान :**

जागतिक महिला दिनाच्या निमित्ताने ज्येष्ठ साहित्यिका व ग्रामीण कथालेखिका डॉ. प्रतिमा इंगोले, पुणे यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले. या वेळी मसाप, सोलापूरने महिलांसाठी आयोजित केलेल्या कथास्पर्धेचा निकाल जाहीर करण्यात आला व विजेत्या स्पर्धकांना पारितोषिके वितरीत करण्यात आली. प्रथम पारितोषिक मसापचे कार्यवाह व्यंकटेश नुले यांच्या स्मरणार्थ देण्यात आले.

**अभिनेते जयंत सावरकर यांचा सत्कार :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, सोलापूर शाखेच्या अमृतमहोत्सवी वर्षानिमित्त प्रसार भारती, आकाशवाणी, सोलापूर व महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा-सोलापूर यांचे संयुक्त विद्यमाने अभिनेते जयंत सावरकर, मुंबई यांचा सत्कार व 'माझा नाट्यप्रवास...' हा आत्मकथनाचा कार्यक्रम आयोजित केला. मसापचे उपाध्यक्ष दत्ता अण्णा सुरवसे यांनी श्रीगणेशाची मूर्ती भेट दिली. 'एकच प्याला' या नाटकातील सुधाकर व तळीराम यांचे काही संवाद रसिकांच्या आग्रहास्तव त्यांनी सादर केले.

**महाराष्ट्र दिनानिमित्त व्याख्यान :**

महाराष्ट्र दिन व कामगार दिनाचे औचित्य साधून डॉ. शरणकुमार लिंबाळे यांचे 'महाराष्ट्र राज्य आणि मराठी साहित्य' या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले. या वेळी लिंबाळे यांनी साहित्याच्या विविध पैलूंतून अभ्यासपूर्ण व्याख्यान दिले. ज्येष्ठ समीक्षक प्रा. निशिकांत ठकार प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

◆

## शाखा दक्षिण सोलापूर

**शाखा सभासद व कार्यकारिणी**

शाखेची स्थापना झाल्यापासून (११.९.२०१४) जे सभासद होते व जी कार्यकारिणी होती, तीच कार्यकारिणी २०१५-१६ या वर्षात होती. त्यात कोणताही बदल झालेला नाही.

**कार्यक्रम १ :**

मसाप दक्षिण सोलापूर तर्फे या वर्षात खालीलप्रमाणे कार्यक्रम घेण्यात आले.

सौ. शोभा बोल्ली संपादित 'एका नामदेवाची दिंडी' नाट्य दिंडी या पुस्तकाचे प्रकाशन फैय्याज शेख यांच्या हस्ते करण्यात आले. या प्रसंगी सुहास पुजारी उपस्थित होते. सदर कार्यक्रम ललित कला मंदिर व मसाप द. सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने घेण्यात आला.

दत्ता हलसगीकर स्मृती समिती, मसाप दक्षिण सोलापूर आणि अ. भा. नाट्य परिषद उपनगरीय शाखा यांच्या संयुक्त

विद्यमाने कविश्री दत्ता हल्सगीकर चौथ्या स्मृतिदिनानिमित्त लक्ष्मीनारायण बोल्ली लिखित 'कवितेचा आत्मस्वर' या पुस्तकाचे प्रकाशन तसेच काव्य नाट्य स्पर्धेचा बक्षीस समारंभ मा. अनंत दीक्षित, ज्येष्ठ पत्रकार यांचे हस्ते करण्यात आला.

**कार्यक्रम २ :**

दि. २९ जुले २०१५ रोजी निर्मलकुमार फडकुले प्रतिष्ठान व मसाप दक्षिण सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने जब्बार पटेल दिग्दर्शित 'सामना' या चित्रपटाला ४० वर्षे पूर्ण झाल्याबद्दल सामना चित्रपट दाखविण्यात आला. त्यानंतर निर्माते रामदास फुटाणे यांनी रसिकांशी गप्पा गोष्टी करताना या चित्रपटाचा प्रवास उलगडून दाखविला. या कार्यक्रमास अखिल भारतीय नाट्य परिषदेच्या अध्यक्षा संमेलनाच्या अध्यक्षा फैय्याज, बाबूराव मैंदर्गीकर, डॉ. श्याम तोष्णीवाल उपस्थित होते.

**अहवाल २०१६-१७ : शाखा सभासद व कार्यकारिणी :**

शाखेची स्थापना झाल्यापासूनचे हे संस्थेचे तिसरे वर्ष आहे. सभासद व कार्यकारिणीमध्ये कोणताही बदल नाही. मसाप दक्षिण सोलापूरचे अध्यक्ष नागेशजी सुरवसे यांचे दि. २२/१२/१६ रोजी दुःखद निधन झाले.

१. दि. २ ऑक्टोबर २०१६ रोजी हेरिटेज लॉन्स व मसाप दक्षिण सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने 'गझल संध्या' हा कार्यक्रम घेण्यात आला. यामध्ये सतिश दुराडे, तेल्हारा, प्रमोद खराडे, पुणे, सुशांत खुटसाळ, औरंगाबाद, वैभव कुलकर्णी, पंढरपूर, सुप्रिया जाधव-जोशी, सोलापूर, श्री. भूषण काटकर, पुणे यांचा सहभाग होता.

२. दि. २१, २२ व २३ ऑक्टोबर २०१६ रोजी हिराचंद नेमचंद ॲम्पी थिएटर येथे मा. विवेकजी घळसासी यांचे 'विवेकाची अमृतवाणी' हा कार्यक्रम घेण्यात आला. यामध्ये 'रामहरी भक्ती सरोवरातीरी' या विषयावर मा. विवेकजींचे ३ दिवस निरूपण झाले.

◆

## मसाप शाखा फलटण

**१. साहित्यिक गप्पा :** श्री. रंगोपंत दाते हे एक फलटणचे प्रथितयश लेखक असून त्यांच्या 'आरक्षण आणि ॲट्रासिटी' या पुस्तकावर साहित्यिक गप्पांचा कार्यक्रम त्यांच्या उपस्थितीत पार पडला.

**२. कवितासंग्रहाचे प्रकाशन :** फलटण तालुक्यातील घुळदेव या गावी असलेल्या 'श्रीमान शेठ धन्यकुमार रतनचंद गांधी विद्यालय' येथे कार्यरत असलेल्या या उपक्रमशील शिक्षकाला 'क्रांतिबा महात्मा ज्योतिबा फुले' आदर्श शिक्षक पुरस्काराने नुकतेच गौरविण्यात आले. त्यांच्या 'अस्तित्व' या छोटेखानी काव्यसंग्रहाचे प्रकाशन फलटण शाखेतर्फे करण्यात आले.

**३. बांधावरचं कविसंमेलन :** फलटण तालुक्यातील विडणी गावातील एक शाखा सदस्य आणि कवी श्री. ज्ञानेश्वर बडवे यांच्या मळ्यात 'बांधावरचे कविसंमेलन' हा आगळावेगळा कार्यक्रम झाला. महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा फलटण आणि सुयश साहित्य प्रतिष्ठान, विडणी यांच्या संयुक्त विद्यमाने हा उपक्रम पार पडला. बांधावरचं कविसंमेलन ही ज्येष्ठ साहित्यिक आणि पत्रकार रवींद्र बेडकीहाळ यांना सुचलेली कल्पना. याप्रसंगी सुप्रसिद्ध कथाकथनकार श्री. रवींद्र कोकरे यांचे कथाकथनही झाले. या प्रसंगी सौ. वैजयंती तुंगार यांना 'साहित्यिक गौरव पुरस्कार' देऊन सन्मानित करण्यात आले. हा पुरस्कार त्यांना शाखेच्या एक कृतिशील सदस्या ॲड. सौ. मधुबाला भोसले यांच्या हस्ते देण्यात आला.

◆

## मसाप : मंगळवेढा शाखा

**दि. २४ एप्रिल २०१७ : प्रकाशन सोहळा :**

आनंद लोकरे यांच्या 'मनातलं चांदणं' या कवितासंग्रहाचे प्रकाशन नामदार लक्ष्मणराव ढोबळे यांच्या अध्यक्षतेखाली झाले. यावेळी डॉ. सुरेश शिंदे, अरुणा माळी, प्रशांत मोरे, भगवान निळे, दुर्गेश सोनार हे उपस्थित होते. प्रशांत मोरे, तुकाराम धांडे, भरत दौंडकर, डी. के. शेख, शिवाजी सातपुते, इंद्रजित घुले, इरफान शेख, गणेश मरकर, शिल्पा देशपांडे, विष्णू थोरे, नारायण पुरी, कृपेश महाजन, जितेंद्र लाड, कविता मोरवणकर, राधिका फराटे, गीता रायपुरे, संगीता अरबुने, अनिल दीक्षित या कवींनी कविसंमेलनात सहभाग घेतला. डॉ. सुरेश शिंदे, सुरेश पवार, पंडित खांडेकर व शाखेचे पदाधिकारी यांनी आयोजन केले.

**गणेश यादव,** (प्रमुख कार्यवाह)

## मसाप : भिवंडी शाखा

१८ मार्च २०१७ : 'अवीट गाणी, उत्कट आठवण' हा दृक्श्राव्य कार्यक्रम श्रीनिवास नाटेकर यांनी सादर केला. शाखा पदाधिकाऱ्यांनी आयोजन केले.

◆



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा होणार कायापालट

## आमदार जयदेव गायकवाड यांच्या आमदार निधीतून चार लक्ष रुपयांचा निधी मंजूर

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालय परिषदेच्या वैभवात मोलाची भर घालण्याचे काम करीत आहे. ५०,००० हून अधिक जुने-नवे ग्रंथ, दुर्मीळ नियतकालिके, सर्व प्रकारचे कोश, संदर्भ ग्रंथ त्यामुळे हे संदर्भ ग्रंथालय संशोधक आणि अभ्यासकांच्या नेहमीच आकर्षणाचा विषय राहिलेले आहे. परिषदेचे आजीव सभासद, अभ्यासक, संशोधक आणि विद्यार्थी यांचा या ग्रंथालयात नेहमीच राबता असतो. या ग्रंथालयाचा आता कायापालट होणार आहे. आमदार जयदेव गायकवाड यांनी त्यांच्या आमदार निधीतून या कामासाठी चार लक्ष रुपये उपलब्ध करून दिले आहेत. त्यातून हा कायापालट होणार आहे अशी माहिती मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी दिली.

प्रा. जोशी म्हणाले, ''मसाप'च्या कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयात स्पर्धा परीक्षा देणाऱ्या विद्यार्थ्यांचा, अभ्यासकांचा, संशोधकांचा आणि वाचकांचा राबता दिवसेंदिवस वाढतो आहे. प्रत्येक लेखक आणि प्रकाशकाला आपले नवे पुस्तक या ग्रंथालयात असावे असे वाटते. त्यामुळे परिषदेच्या ग्रंथालयासाठी आवर्जून पुस्तके पाठविली जातात. पुरस्कारासाठी आलेली आणि मसापत्रिकेकडे अभिप्रायासाठी आलेली पुस्तकेही नंतर ग्रंथालयात जमा केली जातात. अगोदरच मौल्यवान अशा जुन्या संदर्भ ग्रंथांनी ग्रंथालयाचा बराचसा भाग व्यापलेला आहे. त्यामुळे नव्या पुस्तकांसाठी जागा नव्हती. त्यामुळे ही पुस्तके कपाटात ठेवण्याखेरीज पर्याय नव्हता. त्यामुळे वाचकांची गैरसोय होत होती. ही गैरसोय आता दूर होणार असून ग्रंथ सहज चाळता येतील आणि वाचकांसाठी सहज उपलब्ध होतील अशा पद्धतीने फर्निचरच्या माध्यमातून मांडणी करण्यात येणार आहे. तसेच वाचकांना तिथे बसून ग्रंथ वाचता येतील यासाठी व्यवस्था करण्यात येणार आहे. या कामासाठी आमदार जयदेव गायकवाड यांनी आमदार निधीतून चार लक्ष रुपयांचा निधी उपलब्ध करून दिला आहे. लवकरच या कामाचा प्रारंभ करण्यात येईल.' ग्रंथालयाचे कार्यवाह वि. दा. पिंगळे म्हणाले, 'डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्या १२६ व्या जयंतीच्या



निमित्ताने मसापने आयोजित केलेल्या बाबासाहेबांवरील ग्रंथप्रदर्शनाच्या उद्घाटनासाठी आमदार जयदेव गायकवाड परिषदेत आले होते, त्या वेळी त्यांनी ग्रंथालयाला भेट दिली. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार यांनी त्यांना ग्रंथालयाच्या अद्ययावतीकरणासाठी निधीची आवश्यकता असल्याचे सांगितले. ग्रंथांची नीट देखभाल होण्यासाठी ग्रंथालयाचा कायापालट होण्याची गरज लक्षात घेऊन त्यांनी तातडीने हा निधी उपलब्ध करून दिला.'

कै. वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाचा इतिहास परिषदेचे संस्थापक चिटणीस कै. वा. गो. आपटे यांच्या नावाचा 'वा. गो. आपटे इस्टेट ट्रस्ट' सदाशिव पेठेत होता. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे तत्कालीन कार्याध्यक्ष श्री. म. माटे यांनी त्या ट्रस्टच्या विश्वस्तांशी संपर्क साधून १९४९ साली १०,००० रुपयाची देणगी मिळवली. ट्रस्टच्या अटीनुसार आपटे यांच्या स्मरणार्थ संदर्भ ग्रंथालय उभारण्यात आले. १९५१ च्या मे महिन्यात वा. गो. आपटे संदर्भ ग्रंथालयाची प्रतिष्ठापना झाली. या ग्रंथालयातून दुर्मीळ आणि संदर्भात्मक ग्रंथ सोडून कोणतेही पुस्तक सभासदांना घरी वाचण्यासाठी दिले जाते. मसाप ग्रंथालयाचे आधुनिकीकरण आणि संगणकीकरणही लवकरच करण्यात येणार आहे. दुर्मीळ ग्रंथांचे डिजिटायझेशन करण्यासाठी परिषदेने सुरू केलेल्या 'ग्रंथ दत्तक योजनेला' साहित्यप्रेमींनी भरघोस प्रतिसाद द्यावा असे आवाहनही प्रा. मिलिंद जोशी यांनी केले आहे. ◆



अनुक्रमणिका



# क्षणचित्रे




मसापच्या १११च्या वर्धापनदिन समारंभात ज्येष्ठ व्याकरणतज्ज्ञ डॉ. यास्मिन शेख यांना मसाप जीवनगौरव पुरस्काराने सन्मानित करताना डॉ. पुष्पा भावे. सोबत डॉ. भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्काराचे मानकरी डॉ. सु. प्र. कुलकर्णी, सोबत परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे, विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. शिवाजीराव कदम, विश्वस्त उल्हासदादा पवार, कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, कोशाध्यक्ष सुनीताराजे पवार आणि प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे.




साहित्य परिषदेच्या 'मसाप गप्पा' या कार्यक्रमात प्रसिद्ध कवी अशोक नायगावकर यांची प्रा. मिलिंद जोशी यांनी घेतलेली मुलाखत खूप रंगली.




**'ग्रंथाळलेल्या हातांचा सन्मान':**

महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे आणि स्वायत्त मराठी विद्यापीठ बदलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने पुस्तक दिनाच्या निमित्ताने आयोजित कार्यक्रमात भांडारकर प्राच्यविद्या संशोधन संस्थेचे सचिव डॉ. श्रीकांत बहुलकर यांच्या हस्ते जुन्या पुस्तकांची विक्री करणाऱ्या ग्रंथसेवकांचा सन्मान करण्यात आला. सोबत मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, स्वायत्त मराठी विद्यापीठ बदलापूरचे संस्थापक श्याम जोशी, सल्लागार आणि प्रसिद्ध अनुवादक रवींद्र गुर्जर, उपस्थित होते.

# मराठी वाङ्मयाचा इतिहास

संपूर्ण संच ५२५०/- रुपयांत

## संचाची किंमत

| | | |
|---|---|---|
| खंड १ ला : | | रु. ५००/- |
| खंड २ रा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ७००/- |
| खंड ३ रा : | | रु. ३५०/- |
| खंड ४ था : | | रु. ४००/- |
| खंड ५ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३५०/- |
| खंड ६ वा : | भाग १ : | रु. ३५०/- |
| | भाग २ : | रु. ३००/- |
| खंड ७ वा : | भाग १ : | रु. ७००/- |
| | भाग २ : | रु. ८००/- |
| | भाग ३ : | रु. ७००/- |
| | भाग ४ : | रु. ७००/- |
| | | एकूण रु. ७०००/- |

**शाळा, महाविद्यालये आणि व्यक्तिगत ग्राहकांनाही रु. ५२५०/- डिमांड ड्राफ्टने आगाऊ पाठविल्यास संपूर्ण संच** आमच्या खर्चाने रेल्वे अगर एस.टी. पार्सलने पाठवू. (वरील संचातील सुटे भाग हवे असल्यास ग्रंथविक्रेत्यांना २५ टक्के सूट. व्यक्तिगत ग्राहकांना व संस्थांना १५ टक्के सूट. टपालखर्च वेगळा.)

मागणीसाठी संपर्क : **महाराष्ट्र साहित्य परिषद**, टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०. दूरभाष : ०२०- २४४७५९६३

बुक-पोस्ट

प्रेषक
प्रमुख कार्यवाह,
**महाराष्ट्र साहित्य परिषद,**
टिळक रस्ता, पुणे - ४११ ०३०.
दूरभाष : ०२०-२४४७५९६३

Maharashtra Sahitya Patrika. Quarterly : June 2017
Registered with the Register of Newspaper for India under No. 6398/57
Book Pkt. Periodical Category





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

